# महापूर

[ दक्षिण कोंकणांतील एका खेड्यांतील
कांहीं दृश्यें ]

विठ्ठल दत्तात्रेय चिंदरकर

रामकृष्ण प्रकाशन मण्डळ
मुंबई नं. ४

# नदींतील मासे १

वनगांवच्या नदीचा प्रवाह संथपणें वाहात होता. दोन गांवांच्या सीमा तिल खेटून राहिल्यामुळें आपल्या प्रवाहाचा वेग आणि गति तिला त्यांच्याप्रमाणें बदलावीं लागत होतीं. त्यामुळेंच तिला अवघ्या एक मैलाच्या अंतरांतच पांच सहा ठिकाणीं वळणें घ्यावीं लागलीं होतीं. या वळणांमुळें नेहमीं संथ असलेल्य प्रवाहाला वळणांवळणांवर खळखळाटाचें स्वरूप आलें होतें.

माघ महिन्याची कडाक्याची थंडी असल्यामुळें सकाळीं नऊ वाजून गेले तरीही थंडीचा जोस कमी झाला नव्हता. डोंगराच्या कडांवर, झाडांच्या शेंड्यां वर आणि पाण्याच्या पृष्ठभागावर धुकें अजूनही विरल विरल दिसत होतें नदींतून जणूं वाफा वर येत होत्या. त्यांजबरोबर कुठें कुठें नदींतील मासे मधून मधून वर उड्या मारीत होते. आणि त्यांच्यासाठीं टपून बसलेले टिटवी सारखे पक्षी अचानक त्यांच्यावर झडप घालून त्यांना स्वाहा करीत होते.

सूर्याचीं किरणें आतां उन्हाचें स्वरूप घेऊं लागलीं होतीं आणि त्यांचें तेज पाण्याच्या मंद लाटांवर तळपत होतें. अशा वेळीं नदीच्यामधें एका तीरापासून जो अर्धा बांध घातला होता त्यावरील खडकावर बसून एक आठदहा वर्षांच मुलगा हातांत गरी घेऊन मासे गरवित होता. नदीच्या पात्राच्या मधोमध तो खडक होता. तो मुलगा गरी मागें खेंचायला उभा राहिला म्हणजे खडकाच्य बरोबर मध्यावर त्याचें डोकें येई, इतका तो खडक उंच होता. त्य

दोघांत उंचीचें साम्य नव्हतें, तरी रंगाचें खास होतें. नदीच्या प्रवाहाचें पाणी काळेंभोर होतें; त्याहूनही तो खडक काळाभिन्न होता; आणि त्यांच्याहूनही अधिक काळा, तो मुलगा होता.

आठदहा वर्षांचा मुलगा जेवढा उंच असतो तेवढाच तो होता. त्याचें सर्वांग उघडें होतें. वीतभर लंगोटी त्यानें लावली होती मात्र. त्याचे नाक, डोळे कसे नीटस होते. सरळ बारीक नाक, माशांच्या डोळ्यांसारखे डोळे आणि त्या डोळ्यांत एक प्रकारची भेदकता होती. डोकीवर त्यानें केंस वाढविले होते, पण शेंडीही दिसत होती. तो गरवित असतां त्याच्या शेंडीच्या होणाऱ्या हालचाली मोठ्या मजेदार दिसत.

थंडीची पर्वा न करतां भल्या मोठ्या सकाळीं येऊन तो नेहमींप्रमाणें त्या खडकावर येऊन मासे गरवित बसला होता. सकाळच्या ऊन ऊन किरणांची भोपळी काय ती त्याच्या शरिराला उबारा देत होती.

आतांपर्यंत त्याच्या गरीला एकदोन किरकोळ माशांखेरीज कांहीं लागलें नव्हतें. तो थोडा निराश झाला होता. आज दुपारीं माशांचें सांबारें बहुतेक मिळत नाहीं कीं काय, याचा तो समोरच्या तीरावरील माडांच्या लांबचलांब पसरलेल्या ओळींकडे पहात विचार करीत होता.

पलिकडच्या तीरावर असलेल्या झोंपडीमधून धूर येत होता. चार अधिक मासे मिळाले तर ते विकून दोन पैशांचा गरम गरम चहा त्या झोंपडींतील हॉटेलांत जाऊन पिण्याचाही त्याचा बेत होता. पण आज कांहीं तसा रंग दिसत नव्हता. आपल्या गरीला न लागण्याचा माशांनीं जणुं कटच केला आहे असें त्याला वाटलें.

इतक्यांत बंदुकीच्या बाराचा आवाज ऐकूं आला.

बंदुकीचा आवाज निघतांच तो आपल्या विचारांतून एकदम जागा झाला. त्या आवाजाचे निनाद त्या भागांत शिरले.

त्यानें एकदम मागें वळून पाहिलें :

चाकरमान्यांच्या कुत्र्यानें नदींत केव्हांच उडी मारली होती.

तो आपल्या जागेवरून उत्सुकनें उठला. उभा राहिला. आणि कुत्रा कसला मासा आणतो तें पाहूं लागला.

कुत्रा नदींत इकडे तिकडे पोहत होता. बंदुकीनें मारलेला मासा त्याला दिसतांच त्यानें तो आपल्या तोंडांत पकडला. आणि द्रुतगतीनें पोहत पोहत तो आपल्या धन्याकडे, उंबराच्या झाडाजवळ आला.

मुलानें पाहिलें—मासा बराच मोठा आहे. लांबून त्याला स्पष्ट दिसत नव्हतें, तरी त्यानें ओळखलें कीं, तो सुळा असला पाहिजे.

त्याच्या तोंडाला त्या कल्पनेनें पाणी सुटलें. त्याला सुळे फार आवडत असत. आणि मोठ्या सुळ्याची चव कांहीं और असते हें त्याला माहीत होतें.

तो लोभी दृष्टीनें त्या दिशेकडे पाहूं लागला.

तो उभा होता त्या बांधापासून अगदीं थोड्या अंतरावर नदीकांठीं असलेल्या भल्या मोठ्या जुनाट उंबराच्या झाडाच्या बळकट फांदीवर बसून चाकरमानी गरवित बसले होते. झाडाच्या ज्या दोन फांद्या अगदीं जवळून निघाल्या होत्या, त्या दोघांच्या मधोमध त्यांनीं आसन ठोकलें होतें. त्यामुळें निर्धास्तपणें बसून त्यांना खालील पाण्यांतून मासे गरवितां येत होते.

सकाळीं सूर्याचीं किरणें डोंगर माथ्यावरून जेव्हां गांवांत पडत त्याच्याही अगोदर या जागेवर येऊन चाकरमानी रोज बसत. गरी बांधलेल्या लांब काठी-बरोबर, भरलेली बंदुकही त्यांच्याबरोबर असे. कित्येक वेळां मोठे मासे असले कीं ते बंदुकीनें त्यांना मारीत. पुष्कळ वेळां माशांचें भिरेंच्या भिरें जमा होई, त्या वेळीं त्यांवर बंदुकीच्या चार गोळ्या सोडल्या कीं खूप मासे मिळत. रोज कांहींतरी मासे मिळवल्याखेरीज त्यांना चैन पडत नसे.

अंगांत खाकी रंगाचा लष्करी कोट, डोकीला लष्करी पद्धतीचा तसाच कळकटलेला रुमाल, नेसूं काचा मारलेलें धोतर, पायांत चांगल्या जाडजूड आणि लठ्ठ अशा वहाणा, आणि हातांत बंदूक अशा वेषांत ते रोज त्या उंबराच्या झाडावर सकाळीं जाणारा येणाराला दिसायचे.

आणि अशा वेळीं त्यांचें लक्ष आपल्या उद्योगांत इतकें गुंतून गेलेलें असायचें कीं, कुणी वाटेंतून जाणारा येणारानें जर म्हटलें, ‘ रामराम, चाकर-

मानी, ' तर तें त्यांच्या गांवींही नसायचें. खूप मासे मिळाले, किंवा फारच कडक उन्हें लागूं लागलीं म्हणजे ते आपल्या समाधींतून जागे व्हायचे. त्यांचें हें व्यसन गांवच्या लोकांच्या इतकें अंगवळणीं पडून गेलें होतें कीं, त्यांना त्याबद्दल कांहीं वाटेनासेंच झालें होतें. 'रामराम चाकरमानी' म्हणून पुढें निघून जायचें आणि त्यांच्या उत्तराची अपेक्षा करायची नाहीं हें अगदीं टरून गेलें होतें.

आणि आतां बांधावरचा तो काळा मुलगा उंबराच्या झाडाच्या बाजूला येऊन केव्हांचा उभा राहिला होता, हें तरी त्यांच्या कुठें लक्षांत आलें होतें ? त्यांचें लक्ष पुनः एका भल्या मोठ्या माशाकडे लागून राहिलें होतें.

त्या माशानें त्यांच्या गरीला मोठे हिसके द्यायला सुरवात केली होती. तो हिसके देत होता, पण त्यांच्या गरीला अडकला नव्हता. गरीच्या टोंकाला लावलेलें कालवाचें भक्ष्य तो गरीला न अडकतां काढून घेण्याचा प्रयत्न करीत होता. तो सारखे हिसके देत होता.

चाकरमान्यांना वाटलें कीं, गरीला झेंपण्यासारखा कांहीं हा मासा नाहीं. त्यांनीं झाडाच्या फांदीवर गरीची काठी अडकवून ठेविली आणि बंदुकीचा नेम धरला.

पुनः धुडुम् असा आवाज निघाला. चोंहीकडे धूर पसरला. आणि कुत्र्यानें पुनः उडी मारली.

पकडलेल्या माशांच्या पहाऱ्यावर असलेला कुत्रा तेथून नाहींसा होतांच, तो काळा मुलगा पुढें सरसावला. त्यानें आजूबाजूला कुणी पहातें कीं काय, तें पाहिलें. चाकरमानी नवी शिकार पहाण्यांत गुंतलेले त्यानें पाहिलें.

आणि त्यानें बंदुकीनें मारलेला भला मोठा सुळा घेऊन तेथून पलायन केलें.

हा प्रकार इतक्या अल्पावधींत घडला, कीं कुत्र्याला किंवा चाकरमान्यांना त्याबद्दल शंका सुद्धां आली नाहीं.

मुलगा आपल्या जागेवर जाऊन बसला. त्यानें तो मासा आपल्या टोपलींत ठेवून त्यावर फडका टाकला आणि पाण्यांत पुनः गरी सोडली. आपण कुणाच्या गांवचेच नाहीं, असें दाखविण्यासाठीं त्यानें वर मान केली नाहीं.

चाकरमान्यांना मिळालेला नवा मासाही चांगला मोठा होता. त्यांना मोठा आनंद झाला. आज चांगली मेजवानी होईल या कल्पनेनें ते फार खुषींत आले होते. त्यांनीं कुत्र्याला हांक मारली, त्यासरशी तो धांवत आला आणि त्यांचे पाय चाटूं लागला.

" नाम्या, आज छान मासे मिळाले, नाहीं ! "

ते फांदीवरून खालीं उतरले. त्यांनीं वांकून कुत्र्याच्या पाठीवर शाबासकी दिली आणि वाटेच्या अनुरोधानें चालूं लागले. तेथेंच आतांपर्यंत मिळालेले मासे ठेविले होते.

खालीं जमिनीवर उकिडवें बसून त्यांनीं माशांची पहाणी केली.

आणि उकिडवे बसलेले ते ताडकन् उठून उभे राहिले.

त्यांच्या लक्षांत आलें होतें, कीं आपला मोठा मासा कुठें नाहींसा झाला आहे.

त्यांनीं संशयानें कुत्र्याच्या तोंडाकडे निरखून पाहिलें. पण त्यानें तो मटकावला असावा असें कांहीं चिन्ह दिसेना.

त्यांनीं आजूबाजूला पाहिलें. कुणीही चिटपांखरूं दिसलें नाहीं.

मात्र बांधावर नेहमींप्रमाणें गर्वित बसलेला मुलगा तेथें असलेला त्यांना दिसला.

त्यांनीं आपल्या पिशवींत मासे भरले आणि बांधाच्या अनुरोधानें ते करकर जुतें वाजवीत चालूं लागले.

---

## महाराचा पोर २

बांधाच्या दगडांवर जुत्यांचा होत असलेला करकर आवाज कानीं पडतांच त्या मुलाचें अंतःकरण भीतीनें चरकलें. भीतीनें अंतःकरण चरकलें, पण त्यानें लगेच स्वतःला सांवरून धरलें. आणि तो अगदीं खालच्या आवाजांत गुणगुणूं लागला—' गांधी नेहरू लढति मिठागरिं स्वातंत्र्यासाठीं— '

" गांधी नेहरू कशाला ? मीच आतां लढतों तुझ्या बरोबर ! काळ्या ? " चाकरमान्यांनीं आपल्या करड्या आवाजांत खेंसकून म्हटलें.

त्यांची हांक कानीं पडतांच काळ्यानें मागें वळून पाहिलें आणि हास्य करून म्हटलें, " काय चाकरमानी ? आज कितीसे माशे मिळाले ? "

त्यांच्या उत्तराची वाट न पहातां तो पुनः गुणगुणत आपलें काम करूं लागला.

" काळ्या, आधीं असा इकडे ये ! " चाकरमानी गर्जून म्हणाले, " माझा मासा तूं चोरलास कीं नाहीं ? "

" काय बोलतां हें चाकरमानी ? " काळ्या उठून उभा राहून म्हणाला. त्याच्या शब्दांत अत्यंत लीनता दिसत होती. " तुमचा मासा चोरीला गेला का ? मी कां बरं चोरीन तो ? सकाळीं इथं आलों तो उठलों तरी आहे का इथून ? न् तुमचा मासा मी कसा बरं चोरीन ? "

" मोठा धर्मराजाच लागून गेलास कीं नाहीं ? तूंच माझा मासा चोरलास. मुकाट्यानं कबूल कर; नाहीं तर माझ्याशीं गांठ आहे. फोडून काढीन या गरीच्या काठीनं ! "

" नाहीं चाकरमानी. तुमचा मासा मीं चोरला नाहीं. कां उगाच माझ्या नांवावर घालतां ? "

" तर तर, मोठा सावच कीं नाहीं तूं ? तुझ्या नांवावर घालतों ! " त्याला वेडावित ते म्हणाले.

" खरंच मीं नाहीं चोरला. देवा शपथ नाहीं. रामेश्वराची शपथ—" अगदीं गयावया करीत काळ्या बोलला.

" असं म्हणतोस ? बरं ! मग तुझी ती टोपली पाहूं दे रे ! कर बाजूला फडका ! "

काळ्यानें अगदीं स्वाभाविकपणें फडका बाजूला केला.

चाकरमान्यांनीं पाहिलें—एक मोठा सुळा त्याच्या टोपलींत आहे. त्याचें पिवळसर अंग उन्हांत कसें चमकत होतें. बंदुकीच्या छऱ्याच्या खुणाही त्याच्या अंगावर दिसत होत्या.

त्यांच्या अंगाचा तिळपापड झाला.

" काळ्या, किती खोटं बोलतोस ? " ते गर्जना करून म्हणाले.

चाकरमानी आतां रागानें थरथर कांपत होते. काळ्याला खाऊं कीं गिळूं असें त्यांना होऊन गेलें.

मात्र काळ्या अत्यंत शांत होता. त्याच्या चेहऱ्यावर कसल्याही शरमेचें चिन्ह दिसत नव्हतें. उलट त्याचा चेहरा सांगत होता, कीं काळ्या अत्यंत निर्दोषी आहे.

" काळ्या, बोल ! कुणाचा हा मासा ? कुठं तुला मिळाला ? माझाच चोरलास कीं नाहीं ? "

" नाहीं चाकरमानी. मासा माझा आहे. माझ्या गरीला लागला. तुमचा मी कां चोरीन ? "

चाकरमान्यांना धडधडीत दिसत होतें कीं, मासा आपला आहे. त्यावरील बंदुकीच्या खुणा स्पष्ट दिसत होत्या.

आणि काळ्या तर सांगतो आहे, मासा आपला आहे म्हणून.

त्यांचा राग अनावर झाला. त्यांनीं काळ्याच्या चिमुकल्या गालांवर एक थप्पड लगावून दिली.

काळ्याला भिरभिरी आली. त्याच्या डोळ्यांसमोर क्षणभर कांहीं दिसेनासें झालें.

त्यानें थोड्या वेळानें डोळे उघडून पाहिलें. या दरम्यान चाकरमान्यांची आरडाओरड ऐकून आजूबाजूचे पंधरावीस गांवकरी तेथें येऊन केव्हांच दाखल झाले होते.

काळ्यानें डोळे उघडून पाहिलें तेव्हां त्यांना वाटलें, काळ्या खरोखरीच निरपराध असला पाहिजे.

त्यांची तशी आपसांत कुजबूज सुरू झाली. पण चाकरमान्यांपुढें त्यांच्या उलट बोलण्याची कुणाची छाती नव्हती.

पण त्यांची कुजबूज त्यांच्या कानीं गेली होती.

" तुम्हाला खोटं वाटतं ? या पोराच्या गरीब चेहऱ्यानं तुम्हाला भूल पाडली ? असे पुढं या न् पहा तो मासा. त्यावरच्या बंदुकीच्या खुणा पहा. या असे ! "

दोघेतिघे आपलीं कांबळीं सरसावीत पुढें आले.

त्यांनीं पाहिलें—खरोखरीच त्यावर—त्या माशावर बंदुकीच्या खुणा दिसत होत्या. त्यांची खात्री पटली.

एकजण काळ्याला म्हणाला, " काळ्या, चोरलास कीं नाहीं मासा ? "

" नाहीं चोरला—मासा माझा आहे ! " काळ्या आतां रडूं लागला होता.

" अरे या बंदुकीच्या खुणा सांगताहेत कीं हा मासा तुझा नाहीं म्हणून—!"

" हां ! मी तरी तेंच म्हणतों ! " चाकरमानी म्हणाले.

" काय रे काळ्या ? "

काळ्या एक क्षण स्तब्ध राहिला आणि कांहीं निश्चय करून तो म्हणाला, " खुणा असतील. त्यांनीं बंदुक मारल्यावर खुणा कशा नाहीं दिसणार ? म्हणून कांहीं हा मासा त्यांचा होत नाहीं—"

" मूर्खा, काय बोलतोस हें ? खुणा कबूल करूनही मासा त्यांचा नाहीं म्हणतोस ? "

" हो. नाहींच त्यांचा. असे खुणावाले छपन्न मासे नदींत असतील. सगळेच कांहीं मरत नसतात. बंदुकीचा छरा लागलेला मासा माझ्या गरीला येऊन नाहीं का लागणार ? "

काळ्याच्या उत्तरानें प्रश्न करणारे गांवकरी अगदीं निरुत्तर होऊन गेले.

त्यांनाही पटलें, कीं चाकरमान्यांच्या बंदुकीनें सगळेच मासे मरत नसतात. छरा लागलेला एखादा असा मासा फिरत फिरत काळ्याच्या गरीलाही लागणें अशक्य नाहीं.

त्यांना कांहीं बोलतां येईना. त्यांनीं चाकरमान्यांच्या तोंडाकडे पाहिलें. चाकरमान्यांना तें पटत नव्हतें असा त्यांचा चेहरा सांगत होता.

" साफ खोटं. साफ खोटं. हा महाराचा पोर सारं बनावट करून सांगतोय्. मासा माझा आहे. मी त्याला तो असा पचूं देणार नाहीं ! " चाकरमानी आरडाओरडा करून म्हणाले.

इतक्यांत गर्दीमधून वाट काढीत एक काळीसांवळी पण आकर्षक अशी तरुणी तेथें घुसली. घुसली म्हणण्यापेक्षां तिला पाहून सगळ्यांनीं आपोआप वाट करून दिली.

" काय झालं रे काळू ? " तिनें पुढें येऊन विचारलें.

ती काळूची विधवा बहीण जाई होती.

चाकरमान्यांनीं आपल्या भावाला मारण्याची हकीकत तिला कळतांच ती नागिणीसारखी धांवत तेथें आली होती. महारणीचा स्पर्श होईल म्हणून तिला साऱ्यांनीं चटकन् वाट करून दिली होती. वीसबावीस वर्षांचें तिचें वय असेल.

काळूच्या आणि तिच्या रूपांत साम्य होतें, पण काळूइतकी ती काळी नव्हती. कृष्णकमळें जशीं तेजस्वी दिसतात तशी ती आपल्या तारुण्यानें त्या सांवळ्या रंगांतही रसरशीत दिसत होती.

भेदक दृष्टीनें तिनें काळूला पुनः विचारलें,

" काय झालं रे, काळू ? "

" चाकरमान्यांचा मासा त्यानं चोरला न् म्हणतो मींच तो गरवला." कुणीतरी एक बोलला.

तिनें चाकरमान्यांकडे पाहिलें.

" होय, मासा माझा आहे ! " चाकरमानी लष्करी पद्धतीनें मान ताठ करून उत्तर देतात.

" काळू, देऊन टाक तो मासा त्यांना ! " जाईनें काळूला सांगितलें.

" त्यांना हवा तर देतों मी. पण मासा माझ्या गरीला लागलाय् ! " काळू म्हणाला.

चाकरमान्यांच्या मानी मनाला हा अपमान सहन झाला नाहीं. त्यांना मासा हवा होता, पण असा देणगी म्हणून नको होता; स्वतःची शिकार म्हणून हवा होता.

" मुस्काट फोडून टाकीन. हरामखोर. चोर तो चोर अन् वर शिरजोर ! माझ्यावर उपकार करतोस होय ? अन् ही तुझी बहीण फूस देते ? म्हारड्यां-सारखी माझी जीभ मांसाला चटावलेली नाहीं. आधीं चूक कबूल कर मग मासा नेलास तरी चालेल—नाहीं तर माझ्याशीं गांठ आहे. फोडून काढीन. वेळ पडल्यास बंदूकही झाडण्यास कमी करणार नाहीं. कमानी साहेबांपुढं मान वांकविली नाहीं तो—"

" मासा मीं चोरलाच नाहीं—"

काळूचें वाक्य पुरें होण्याच्या आंत त्याच्या अंगावर चाकरमानी धांवले.

" हं, खबरदार त्याच्या अंगाला हात लावाल तर—" पुढें होऊन जाई उद्गारली.

त्या वेळचा तो जाईचा अवतार पाहून चाकरमान्यांच्या अंतःकरणालाही भीतीचा चरका बसल्यावांचून राहिला नाहीं.

" काय करशील ? बोल, काय करशील ? छाती आहे कुणाची पुढं यायची ? या पोराला या बंदुकीनं मी ठार करणार—"

त्यांनीं बंदुकीला हात घातला.

" हां, सुरबा, असा अविचार करूं नकोस ! " कुणीतरी त्यांचा हात धरून म्हटलें.

चाकरमानी न म्हणतां आपल्या ' सुरबा ' नांवानें हांक मारून आपणाला थांबवणारा कोण आहे म्हणून त्यांनीं मागें वळून पाहिलें.

खादीचा शुभ्र वेष परिधान केलेली एक व्यक्ति त्यांना दिसली. पन्नाशीच्या घरांत गेलेली पण अजूनही तारुण्याचीं चिन्हें न मावळलेली अशी एक गौर वर्णाची, किंचित् ठेंगू अशी मूर्ति त्यांना प्रतिकार करायला आली होती.

चाकरमान्यांनीं त्यांच्याकडे किंचित् रागानें निरखून पाहिलें. आणि ओळख पटतांच हंसून म्हटलें, " कोण ? महादेवा !—"

" ओळखलंस म्हणायचं ? "

जाईला वाटलें, प्रत्यक्ष महादेवानेंच आपल्या भावाचें रक्षण केलें !

---

# बाहुपाशांतील रमणी ३

" ओळखलं म्हणजे काय, ओळखलंच !" चाकरमानी हंसून म्हणाले. " बाळपणींच्या मैत्राला ओळखलं नसतं तर नवल होतं. कायरे, किती वर्सांनीं आपण भेटतों आहोंत, नाहीं ? मला वाटतं—"

" तूं पलटणींत जाण्यासाठीं पळून गेलास–"

" हां, हां, बराबर बोललास. तेथपासून तुझी न् माझी भेट नाहीं. पळून जो गेलों तों वीस वर्सांनीं परत आलों गावांत–अन् सुरबा म्हणून नव्हे–चाकरमानी म्हणून–मेजर सुभेदार होऊन. ज्यांना मी त्या वेळीं भिऊन वागत होतों तेच मला नंतर भिऊन वागूं लागले ! तूं काय करतोस रे ? तुझ्याबद्दल खूप ऐकतों आम्ही. कोण म्हणतो महादेव मोठा वकील झाला आहे. कोण म्हणतो कंत्राटदार आहे न् कोणी म्हणतात व्यापार करतो—पण नक्की काय करत असतोस तें कधींच कळलं नाहीं. का हे सगळेच धंदे करतोस ?" चाकरमानी खद्खदां हांसून म्हणाले. " बाकी हे सगळे धंदे करण्याएवढं डोकं दिलं आहे तुला देवानं हां. आम्ही काय आपले शिपायी गडी. धर बंदूक, धरली. उचल म्हटलं, उचलली. घाल गोळी म्हटलं, घातली. कां, कशाला न् कुणाला हे प्रश्न आमच्या हिशेबीं नाहींत—"

आजूबाजूचे गांवकरी त्यांच्याकडे आ वासून पाहात होते. काळू आणि

जाई तर त्यांच्या बाजूलाच राहून त्यांचें बोलणें ऐकत होतीं. त्यांच्या बोलण्याच्या संदर्भानें त्यांनीं तर्क केला कीं, आपल्या गांवचा मुंबईला मोठा वकील असलेला महादेव ठाकूर तो हाच. त्याच्याबद्दल ऐकून पुष्कळ ठाऊक होतें त्यांना; पण त्याला प्रत्यक्ष पाहण्याचा योग त्यांना अजून आला नव्हता. कसा येणार ? गेल्या पंचवीस वर्षांत ते आपल्या गांवीं कधींच आले नव्हते. सुरबा पळून गेले होते तसेंच जवळ जवळ तेही पळून गेले होते घरांतून. त्यांच्याबद्दलच्या ऐकीव कथा आतां गांवकऱ्यांना आठवूं लागल्या आणि आपल्या गांवचा एक माणूस मुंबईला जाऊन मोठा होऊन आला आहे याचा त्यांना अभिमान वाटला. त्या जाणिवेनें एकजण पुढें होऊन म्हणाला, "आतां ओळखलं तुला महादेवा मीं. त्या वेळीं तूं एवढासा पोर होतास. आतां मोठा झालास तरी लक्षण कांहीं बदललेलं नाहीं !"

"मीं नाहीं ओळखलं—ओ–हो–ओळखलं." महादेव म्हणाले. "जिवा गांवकर तुम्ही, नाहीं ? काय जिवबा, ठीक आहे ? मुलंबाळं खुशाल ?"

जिवबानें हंसून म्हटलें, "आतां कसलं आलं आहे ठीक ? या नव्या जमान्यांत जमत नाहीं आपलं. कलियुग आहे हें. तेव्हां कुणाला बोल लावायचा ? डोळ्यांनीं पहावत नाहीं म्हणून कढ येतात. आतां अखेरीकडे डोळे लावून बसलों आहोंत !" म्हाताऱ्याची मुद्रा आतां कष्टी झाली होती.

"चालायचंच असं जिवबा —"

"अरे पण असं वाटेवर काय बसून ? इतक्या वर्सांनीं आला आहेस तो घरीं जा. म्हातारीला भेट, आम्ही आहोंच. भेटूं–आतां रोज येऊन, रजाबिजा भरपूर घेऊन आला आहेस ना ?"

"आतां इथंच राहायला आलों आहें मी !"

"अस्सं ? वा ! फारच उत्तम गोष्ट ! चला !"

आतां सगळी मंडळी चालूं लागली. बाकीचे आपल्या कामाला गेले. महादेव, चाकरमानी, जाई आणि काळू एवढीच मंडळी राहिली. आणि ते बोलत बोलत चालूं लागले.

" अरे सामानसुमान तुझं कांहीं आहे का ? "

" सामान लगेच घरीं पाठवून दिलं. होडींतून मी पहात होतों तुमचं भांडण. तुला मीं नदींत असतांनाच ओळखला. होडी किनाऱ्याला लागल्या-बरोबर सामान घरीं पाठवून दिलं नि इकडे आलों. म्हटलं आमचा सुरबा एवढा रागावला कां आहे ? काय झालं रे ? "

" त्याचं असं झालं —"

" तें मला कळलं सारं. तुमच्या बोलण्यावरून समजलों मी सारं. पण मी तुला विचारतों, असल्या क्षुल्लक बाबतींत रागावलास कां ? पोरानं चोरला असेल मासा, त्यावरून एवढं बंदुकीपर्यंत यायला काय झालं ? "

" अरे माशाला का मी हपापलों होतों ? रोजचाच आहे उद्योग हा माझा. मला चीड आली ती या पोराच्या खोटं बोलण्याची. खरं बोलला असता तर सोडून दिला असता; पण नाहीं, यांना खोटंच बोलण्याची संवय—पहा कसा हंसतो आहे गालांत, पहा. विचार...तूंच विचार त्याला खरं काय तें. आतां मी कांहीं सुद्धां करणार नाहीं. झालं गेलं, गंगेला मिळालं. काळ्या, आतां तरी खरं सांगशील ? कांहीं करणार नाहीं तुला मी. अगदीं बोलून टाक—"

काळ्यानें खालीं मान घातली होती.

महादेवांनीं पाहिलें—काळ्या शरमला आहे.

त्यानें हळूच वर पाहिलें आणि महादेव आपल्याकडे पहात आहेत असें पाहून पुनः खालीं मान घातली. मघाशीं एवढ्या धिटाईनें मार सहन करीत असलेला मुलगा आतांच एवढा नरमला कां, याचें त्यांना आश्चर्य वाटलें. त्या वेळीं त्याच्या चेहऱ्यावर किती तेज दिसत होतें. खोट्याच्या समर्थनासाठींही माणूस अंतःकरणापासून भांडूं शकतो तर ! सत्यानेंच तोंडाला उजाळा येतो असें नाहीं. खोट्यासाठीं आपण नव्हतों का कोर्टात भांडत ? सगळेच खटले कांहीं सोज्वळ नसायचे आपले. पैशासाठीं आपण चोरासाठींही शिरा ताणून कोर्टात भांडत होतों. अगदीं अंतःकरणपूर्वक भांडत होतों. कां भांडत होतों ? पैशासाठीं—पोटासाठीं—मानमान्यतेसाठीं—लौकिकासाठीं—काळू खोटें बोलला, त्यानें आपल्या खोटेपणाची नेकीनें तरफदारी केली. अंगा-

वरची चामडी तुटत होती तरी तो खोट्यासाठीं झगडला. बंदुकीच्या गोळीन प्राण जाण्याची पाळी आली होती तरीही तो आपलें म्हणणेंच खरें धरून बसला. तोही असाच माझ्यासारखा पोटासाठीं, पैशासाठीं, मानमान्यतेसाठीं असेल का ? त्याला मानमान्यता कसली आली आहे ? पण पोटासाठींच तो खास एवढें सहन करीत असला पाहिजे.

महादेवांच्या मनांत हे विचार येतांच काळूविषयीं त्यांना विलक्षण सहानुभूति वाटूं लागली.

" पाहिलंस महादेवा ? " चाकरमान्यांनीं विचारलें.

" काळू, आतां तोंडानेंच सांग काय तें ! मासा चोरलास कीं नाहीं तूं ! "

काळूनें वर मान करून उत्तर दिलें, " होय, चोरला मीं."

आणि या वेळींही त्याच्या चेहऱ्यावर विलक्षण तेज चमकत असल्याचें महादेवांना दिसून आलें. ते मनांत म्हणाले—किती नेकजात पोर आहे. ही नेकी चांगल्या कार्याला लागली तर तिचा केवढा उपयोग होईल. खेड्यापाड्यांत अशीं शेंकडों माणसें पसरलेलीं असतात. पण त्यांचा हा गुण मातीमोल होऊन जातो.

त्यांनीं मनाशीं ठरविलें कीं, या मुलाला आपल्या कार्यासाठीं हाताशीं धरला पाहिजे. हा मुलगा फुकट जाऊं देतां कामा नये.

" झाली खात्री ? " चाकरमान्यांनीं विचारलें.

" बाकी पोरगा मोठा हुशार आहे हं ! याला शिक्षण मिळालं तर मोठ्या नांवालौकिकाला येईल—! "

" महादेवा, काय उपयोग या म्हाराला शिक्षण मिळून ? शेवटीं गुरं राखणारा राखणाच होणार ना ? देवापुढं जाऊन ढोलच वाजविणार ना ? गांवांतलीं मेलेलीं ढोरं वेशीबाहेर नेऊन सोलणार ना ? असं करण्यापेक्षां मुळीं न शिकलेलंच बरं."

थोडा वेळ थांबून पुढें चाकरमानी म्हणाले, " या पोराचा मोठा भाऊ

विंग्रजी सहा बुकांपर्यंत शिकला आहे, पण आज बामणाच्या घरचा राखणा होऊन आंबोण भुरकतो आहे ! कुठं गेलं तें शिक्षण ? ”

“ काय म्हणतोस ? ” महादेवानीं आश्चर्यानें विचारलें.

“ कुणी नोकरी देईना. मराठी सातवी पास झाला आहे, पण महाराचा मास्तर कसा होईल ? महाराला कारकून होतां येत नाहीं नि मास्तर होतां येत नाहीं. महाराला एक होतां येतं–गुराखी.”

चाकरमानी चिडून बोलत होते. त्यांच्या अंतरींची भगभग त्यांत महादेवांना दिसून येत होती.

“ मीं या गांवच्या लोकांना किती सांगितलं, कीं आपल्याच गांवचा एक–महार का होईना पण—चार मैल रोज पायपीट करून शहरांत जाऊन एवढं विंग्रजी शिकला आहे, देवळांत शाळा घालून चार अक्षरं शिकूं देऊं या इतर पोरांना. पण त्यांना पसंत नाहीं पडलं. महाराला मास्तर कसं करायचं ? उष्टं खरकटं खाणारा आमच्या घरचं, त्याला का हे गांवढळ मास्तर होऊं देणार ? मरा म्हटलं लेकांनो. तुम्ही एक अडाणी झालां, तुमचीं पोरं सात अडाणी होऊं द्या. चार गांवचं पाणी चाखल्यामुळं थोडी नवी दृष्टी आलीय् मला. पण कोण कुत्रासुद्धां विचारीत नाहीं ! ”

इतक्यांत ते येऊन पोंचले होते तेथें दुसरा रस्ता फुटत होता. चाकरमान्यांच्या घराकडे जाणारा तोच रस्ता होता. आपल्या नाम्या कुत्र्याला चुचकारून चाकरमानी म्हणाले, “महादेवा, भेटेन संध्याकाळीं–चल रे नाम्या.”

चाकरमानी जात होते. महादेव त्यांच्याकडे सारखे पहात चालले होते. मनांतून त्यांना खूप आनंद वाटला.

जाई आणि काळू त्यांच्याबरोबर चाललीं होतीं. त्या दोघांना त्यांच्याबद्दल इतका आदर वाटूं लागला होता कीं, तीं दोघें भारल्यासारखीं त्यांच्याबरोबर चालत होतीं.

वाटेंत कमळांनीं भरलेलें तळें लागलें. महादेवांना आठवलें—याच तळ्यांत आपण आपल्या सोबत्यांसह पोहायला येत होतों. रक्तवर्णाचीं कमळें पाहून

त्यांना आनंद वाटला. बालपणांत चित्रविचित्र आणि भडक रंग आवडत असतो. महादेवांनाही त्या वेळीं यामुळेंच तांबडीं कमळें फार प्रिय असत. आज त्यांच्या दृष्टीला पांढरीं शुभ्र कमळें आवडलीं असतीं. पण बालपणींच्या त्या स्मृतीनें त्यांना कांहीं तरी मधुरमधुर असें अनुभवाला येत आहे असें वाटलें.

ते चालत होते ती पायवाटच होती. दोन्ही बाजूला आंबे, फणस, रातांबे यांचीं झाडें सारखीं दाटीनें उभीं होतीं. त्यांपैकीं बरींच झाडें त्यांच्या परिचयाचीं होतीं. त्यांना पाहून पुनर्भेटीचा आनंद त्यांना वाटला. एखादी परिचित व्यक्ति फारा दिवसांनीं भेटल्यावर जसा आनंद अंतःकरणांतून ओसंडून बाहेर पडतो तसें त्यांना झालें. त्या झाडांतून वहाणारा वारा त्यांना सुखकारक वाटला. त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले.

थोडें पुढें गेल्यावर काजूचीं झाडें ओळीओळीनें उभीं असलेलीं त्यांना दिसलीं. त्यावर पिवळे आणि लाल काजू कसे डोलत होते. क्वचित् त्यांवर कावळे चोंचीनें प्रहार करीत होते. काजूच्या नव्या मोहराचा उग्र वास येत होता. तीं झाडेंही त्यांच्या परिचयाचीं होतीं.

काजूच्या झाडांपलिकडे उतरणीवर स्मशान होतें. स्मशानांत दृष्टि जातांच महादेवांचे डोळे पाण्यानें भरून आले. तेथें आपली प्रिय आई जणुं अजून निद्रा करीत आहे असें त्यांना वाटलें. त्यांनीं रुमालाने डोळे पुसले. क्षणभर तेथें उभें राहून त्यांनीं आईच्या स्मृतीला अंतःकरणपूर्वक वंदन केलें.

जाई आणि काळू त्यांच्या कृतीकडे अत्यंत विस्मयानें आणि आदरानें पहात होतीं.

इतक्यांत चढण लागली आणि माळरान दिसूं लागलें.

माळरानावर जिकडे तिकडे सफेत माती आणि दगड पसरले होते. जिथें दगड आणि माती दिसत होतीं तेथेंच चुनखडीच्या दगडांच्या खाणीचीं विवरें दिसत होतीं.

त्या खाणींत दगड काढण्याचें काम चाललें होतें. दगड खणतांना होणारा हत्यारांचा आवाज अस्पष्ट ऐकूं येत होता.

महादेवांना जुन्या स्मृति पुनः होऊं लागल्या. याच खाणींत ते अनेक वेळां उतरले होते; उतरल्याबद्दल भावाच्या हातचा मार खाल्ला होता.

मोठ्या कौतुकानें ते वाटेवरून बाजूच्या एका खाणीकडे गेले आणि वांकून पाहूं लागले—

आणि आंतील दृश्यानें ते चांगलेच चमकले.

आंत खोल खोल अंतरावर एका पोखरणींत दोन व्यक्ति उभ्या होत्या. एक तरुण स्त्री होती; दुसरा पुरुष होता. दोघेंही परस्परांच्या बाहुपाशांत जगाला विसरलीं होतीं.

---

## सोनचांफा फुलला ४

“ वहिनी, कशाला आतां त्या जुन्या गोष्टी उकरून काढून जीव कष्टी करतेस ? ”

“ महादू, नाहीं रे, जोंवर सारं ठीक होतं तोंवर कांहीं तुझी आठवण पडली नाहीं आम्हांला. पुढं हें असं झालं. वाटलं तुला कळवावं--तुझ्याकडे यावं. पण धीर झाला नाहीं. कुठल्या तोंडानं तुझ्याकडे यायचं ? थोडा का चांडाळणीनं छळ केला तुझा ?—”

महादेवांना आतां ते दिवस आठवूं लागले : वडील भाऊ आणि भावजय यांच्या स्वाधीन करून आपली आई आपल्याला सोडून गेली होती. मरतांना दादाकडून तिनें वचन मागून घेतलें होतें कीं महादेवाला अंतर देणार नाहीं. वहिनीला ती म्हणाली होती, ‘ माझ्या महादूला चांगल्या रीतीनें वागीव. आईची आठवण त्याला होऊं देऊं नकोस. तो जरा हट्टी आहे, हूड आहे, पण तेवढाच हळव्या मनाचा आहे. त्याच्या दुगुर्णांकडे कानाडोळा कर—’

महादेवाला आठवूं लागलें, खरेंच आपण किती हट्टी आणि वात्रट होतों. या स्वभावामुळेंच वहिनीचें आणि आपलें जुळेना. रोज घरांत भांडणें होऊं लागलीं. एकदां तर वहिनीनें आपणाला उपाशीं ठेविलें होतें. दादानें चिंचेच्या काठीनें सडकून मार दिला होता.

आणि त्या रागाच्या तिरमिरीसरशीं आपण घरांतून पळून गेलों. घराचें पुनः तोंड पहावयाचें नाहीं असा निश्चय करून पळून गेलों.

पुनः परत आलों खरा, पण कर्तबगारी मिळवून. आज वहिनीलाही पश्चात्ताप होत आहे. तिच्यावरचा राग तरी आज कुठें माझ्या मनांत आहे ? नाहीं तरी तिच्यामुळेंच मी आजच्या वैभवाच्या स्थितीला जाऊन पोंचलों. साऱ्या गांवच्या उद्धारासाठीं आज मी पुनः येथें आलों आहें, तो वहिनीसारख्या अज्ञानी स्त्रीवर राग कसा करीन ? झालें तें सारें विसरून गेलों आहे मी.

" वहिनी, आतां तरी माझा विश्वास वाटतो का ? कसलीही काळजी करूं नको. म्हातारपणचे दिवस सुखासमाधानांत घालवा. महादू तुमचा धाकटा दीरच नाहीं, मुलगाही आहे असं समजा. नाहीं तरी वडील भावजय ही आईसारखीच असते, नाहीं ? "

महादेव आपल्या घरीं आल्यावर दुसऱ्याच दिवशीं हा प्रसंग घडला. त्यांच्या वृद्ध वहिनीला त्यांच्या आगमनानें अतिशय आनंद वाटला. जुना राग, मत्सर आतां तिच्या अंतःकरणांत शिल्लक राहिला नव्हता. ते आले — अगदीं अकस्मात् आले — आपल्या घरीं रहायला कायमचे आले याचें त्या वृद्ध स्त्रीला अंतःकरणापासून समाधान वाटलें. दोन्ही वेळां भरपूर खायला मिळेल अशी घरची स्थिति होती, पण एवढें मोठें रिकामें घर तिला खायला येत असे. घरांत कुणी तरी आपलें म्हणून असावें, कुणी तरी प्रेमानें आपणाला हांक मारावी, कुणी तरी आपली अंतःकरणपूर्वक विचारपूस करावी असें तिला अलिकडे वाटूं लागलें होतें. पण तसें कुणीच नव्हतें. त्यामुळें तिच्या जिवाला चुकल्याचुकल्या सारखें झालें होतें. स्त्री काय किंवा पुरुष काय वृद्धत्वाच्या सीमेंत प्रवेश करूं लागलीं कीं त्यांना कुणाचा तरी आधार हवा असतो. हा आधार पुरुषाचा असो वा स्त्रीचा असो. तो जर मिळाला तर जीवनाच्या उतरंडीचा प्रवास त्यांना सुखकारक वाटत असतो; वृद्धपणाची जाणीव त्यांना होत नाहीं त्यामुळें. पतीपत्नी दोघांच्याही वृद्धपणापर्यंत जर ह्यात असलीं तर त्यांना परस्परांचा आधार पुरेसा असतो. पण महादेवांच्या वहिनीचा तो आधार कधींच तुटला होता. पुत्रलाभ तर त्यांना झालेलाच नव्हता, त्यामुळें त्याही दृष्टीनें उणीवच होती.

महादेवांच्या उद्‌गारांनीं तिला धन्यता वाटली. वृद्धपणींच्या यातना ती क्षणभर विसरली.

महादेव आल्यापासून साऱ्या घरभर फिरत होते. ज्या घरांत ते खेळले, बागडले, लहानाचे मोठे झाले त्या घरांतील प्रत्येक वस्तु त्यांना पुनर्दर्शनाचा आनंद देत होती.

कोनाड्यांतील धूळ खात पडलेल्या जात्याकडे दृष्टि जातांच महादेवांनीं विचारलें, " वहिनी, जात्याला हात न लावून किती वर्षें झालीं असतील ? "

" कां रे बाबा, तुला दळायला बसायचं आहे का ? "

" खरंच वहिनी, तूं जर या वेळीं दळायला बसलेली असतीस तर खचीत मीही येऊन बसलों असतों."

" लहानपण आलं वाटतं अंगांत ? "

" वहिनी तुला आठवतं का, आई न् तूं याच ठिकाणीं दळायला बसलां होतां न् मी हट्ट घेऊन बसलों होतों—मी दळायला बसणार म्हणून ? "

" खरंच, महादू ! "

दोघेंही जुन्या स्मृतींत रंगून गेलीं.

पडवींत गाई आणि वासरूं बांधलेलीं होतीं. तेथें वासराच्या अंगावरून हात फिरवीत महादेव विचारूं लागले, " वहिनी, ही गाय ग कुठली ? आपल्या घरचीच आहे का विकत घेतलेली ? मला मंगळा गाय आठवते. तिची ही कोण लागते ? "

" मंगळेची ही खापरपणती लागते म्हणेनास ! " वहिनी हंसून म्हणाली.

महादेवांना तें ऐकून अतिशयच आनंद वाटला. ते गाईच्या अंगावरून हात फिरवूं लागले. जणुं आपल्या मंगळा गाईच्याच अंगावर आपण हात फिरवीत आहें असें त्यांना क्षणभर वाटलें आणि त्यांचें अंग पुलकित झालें.

महादेवांनीं आपल्या लहानपणीं परड्यांत सोनचांफ्याचें एक रोपटें आणून लावलें होतें. त्याचें मोठें झाड झालेलें पहायला ते घरीं राहिले नव्हते. आतां त्याचा बराच मोठा विस्तार झाला होता. नुकत्याच कळ्याही फुटूं लागल्या होत्या.

" वहिनी, चांफा चांगला फुलतो का ग ? "

" तूं गेलास त्याच वर्षी कसा बहर आला होता. पण त्यानंतर कांहीं फारसा आलेला नाहीं. या वर्षी प्रत्येक फांदी फुटलेली दिसते तेव्हां

तसाच बहर येणार असं दिसतं. तूं आलास ना, तेव्हां चांफा फुलल्याखेरीज कसा राहील ? "

महादेवांचे डोळे अश्रूंनीं डबडबले.

अंगणाच्या ओटीवर बसून वहिनी महादेवाशीं बोलत होती. महादेव तिच्या मनाचें सांत्वन करीत होते.

इतक्यांत काठी टेकीत टेकीत एक वृद्ध गृहस्थ तेथें येऊन उभा राहिला.

त्याच्या अंगावर एका फाटक्या कळकटलेल्या पंचाखेरीज कांहींही नव्हतें. काठीचा आधार घेऊन त्याला चालावें लागत होतें. यावरून तो किती वृद्ध होता याची कल्पना येईल. त्याच्या उघड्या अंगावरील केंस पिकून पांढरे झाले होते. डोकीवर एकही केस शिल्लक राहिला नव्हता. अंगावरच्या शिरा स्पष्ट दिसत होत्या.

त्यानें अंगणांत बैठक मांडली आणि महादेवाकडे पाहून म्हटलें, " म्हाद्या, ओळखलंस मला ? मी तो तुझा बाळमित्र भिक्या सुतार ! "

महादेव पुढें झाले आणि त्यांनीं भरल्या डोळ्यांनीं त्याला मिठी मारली.

" अरे, अरे, काय हें ? तुझे कपडे मळतील ! "

" भिकू, कपडे तुझ्यापेक्षां का रे मला जास्त आहेत ? "

" ठीक. माझा म्हाद्या आहे तसाच आहे. आनंद आहे. वाटलं होतं, तूं माझ्याशीं बोलशील कीं नाहीं. तूं आतां केवढा मोठा झालास. आम्ही कर्मदरिद्री, आहों तसेंच आहोंत. वाईट नाहीं वाटत हां म्हादू. आनंद आहे तुझ्या वैभवाचा. सगळ्यांत जास्त बरं वाटलं तें तुझ्या प्रेमाबद्दल—" म्हातारा इतक्या अंतःकरणपूर्वक हंसून बोलत होता कीं त्याला हर्षातिशयानें नीट हंसतांही येत नव्हतें—त्यामुळें तो हांसत आहे का रडत आहे हेंही नीट समजत नव्हतें.

" भिकू, असा सावलीला बस. उन्हांत तिरमिरशील ! " त्याला हाताला धरून उठवीत महादेव म्हणाले.

" सकाळीं रोजचाच बसून असतों उन्हांत. उन्हांत बसलं कीं जरा बरं वाटतं ! "

महादेवांनीं त्याला सावलींत अगदीं आपल्या शेजारीं नेऊन बसविलें.

" भिकू, तुझं कसं काय चाललं आहे ? मुलंबिलं किती आहेत ? "

" काय सांगायचं म्हादू ! ती गेल्यापासून असा पांगळा होऊन बसलों आहें. एक मुलगा आहे. पण तो माझ्या कह्यांत नाहीं. बाकी तोच आतां धंदा उद्योग पाहातो. पण आतां धंद्यांत कांहीं राम उरलेला नाहीं—आतां दगडी भांड्यांना कुणीच विचारीत नाहीं. म्हारंपोरंसुद्धां चिनीमातीचीं भांडीं घेऊं लागलीं. उगाच खाणींचा खंड भरतों झालं. घरांत माल पडून आहे."

" मग कसं काय चालतं इथल्या सुतारांचं ? "

" धंदा टाकून पळून गेले आहेत मुंबईला. ज्या गांवांत रोज पंधरावीस चरक लागायचे तेथें आज दोनचार जेमतेम ऐकूं येतात. ज्यांना नोकरी करतां येणं शक्य होतं ते शहरांत गेले. बाकीचे अर्धपोटीं आहेत फकांड्या मारीत."

" कोण फकांड्या मारतो रे ? "

महादेव आणि भिकू सुतार या दोघांनींही मागें वळून पाहिलें. सुरबा चाकरमानी आपल्या सरंजामासह तेथें आले होते.

" काय म्हणतो हा भिक्या ? " बसतां बसतां त्यांनीं विचारलें.

" धंदा चालत नाहीं म्हणतो. दगडाच्या भांड्यांना आतां कुणी विचारीत नाहीं म्हणतो."

" खरं आहे तें. गांवांतल्या गांवांत अशी काय विक्री होणार आहे ! शहरांतल्या लोकांना दगडा मातीच्या भांड्यांची आतां लाज वाटूं लागली आहे. त्यांना जर्मन सिलवरचीं भांडीं लागूं लागलीं, न् त्यामुळं आमच्या गांवचे सुतार उपाशीं मरूं लागले— "

महादेवांनीं एक उसासा सोडला.

चाकरमानी पुढें बोलूं लागले, " या भिकूच्या मुलाचंच पहाना. चांगला तीस वर्षांचा बांगर झाला आहे, पण अजून लग्नाला पत्ता नाहीं. आज दहा वर्सं हा त्याचा बाप त्याचं लग्न करतो आहे, पण कशाला कांहीं पत्ता ! कां हें असं ? भिकूच्या मुलाला मुलगी द्यायला कुणी तयार नाहीं. पोरगा रोज सारखा खपतो, पण घरांतली एकादशी न् शिवरात्र कांहीं ढळत नाहींत— "

" सुरबा, काय हें ? कशाला माझं दैन्य महादेवापुढें उघडं करतोस ? " भिकू ओशाळून म्हणाला. आपली गरीबी अशी पुढें आलेली त्याला आवडली नाहीं.

" भिकू, तुझं उणं का मी काढीत आहें ? अरे, खरं तें सांगतों या महादेवाला. कुणी परका का आहे तो ? न् महादेवापुढें गाऱ्हाणं नाहीं सांगायचं तर कुणापुढें सांगायचं ? "

" भिकूच्या मुलाचं गरीबीमुळें लग्न होत नाहीं म्हणतोस ? "

" छे ! गरीबी एक वेळ असती तरीही चाललं असतं. त्याहीपलीकडे आहे स्थिति. रोजच्या एकादशा न् शिवरात्री. कशी कुणी पोर देईल या घरांत ? पण मी भिकूला किंवा त्याचा मुलगा भगवान् याना दोष देत नाहीं याबद्दल. गांवांतल्या इतर रिकामटेकड्या पोरांपेक्षां भगवान् पुष्कळ बरा. चकाट्या पिटीत वेशीवरच्या हाटेलांत चाय खात बसण्यापेक्षां भगवानचे उद्योग पुष्कळ बरे. पण मोल नाहीं त्याच्या उद्योगाला ! तो पहा भगवान्च चालला आहे. गाढवालाही झेपणार नाहीं असं दगडांचं ओझं घेऊन चालला आहे."

भगवानाची जाण्याची वाट महादेवांच्याच दारांतून होती. पांढरे दगड घेऊन तो चालला होता. त्याच्या एका खांद्यावर कुदळ आणि तासणी होती. लांबून पहाणाराला त्याचा देह मजबूत वाटला असता. त्याचें अंग उघडें होतें. छातीवर काळेभोर केस होते. हातापायाचें हाडपेर दणकट दिसत होतें. त्यानें या वेळीं धोतर खोवून घेतलें होतें. त्यामुळें त्याच्या भरदार पोटऱ्या आणि मांड्या स्पष्ट दिसत होत्या.

त्याला चाकरमान्यांनीं हांक मारतांच तो थांबला, आणि वळून पाहूं लागला.

डोकीवरचं ओझें तेथें उतरून खालीं ठेवून तो पुढें झाला.

तो पुढें आला तेव्हां लांबूनच चांगला दिसत होता असें महादेवांना वाटलें. जवळ येतांच गालफडें बसलेलीं, डोळे खोल गेलेले, काळवंडलेले दिसले.

तो अगदीं जवळ आला तेव्हां महादेवांना वाटलें—याला कुठें तरी आपण पाहिलेलें असावें.

थोडा वेळ विचार केल्यावर त्यांना वाटलें–खाणींत ज्याच्या बाहुपाशांत कुणी तरी एक स्त्री होती तो इसम हाच असला पाहिजे.

" हा भिकूचा मुलगा भगवान् ! " चाकरमानी म्हणाले, " बस रे भगवान् ! "

भगवान् बसला. अगदीं अदबीनें बाजूला बसला. महादेव त्याच्याकडे निरखून पहात होते. त्यांना वाटलें भगवानाची दृष्टि शून्याकार आहे. कांहीं तरी अज्ञात वस्तूचें जणुं ती संशोधन करीत आहे. त्यांनीं विचारलें,

" भिकूचा मुलगा काय ? "

भगवाननें त्यांच्याकडे पाहिलें. आणि लगेच दृष्टि दुसरीकडे वळविली. महादेवाच्या नजरेला नजर देण्याचें धैर्य त्याला झालें नाहीं.

चाकरमान्यांनीं आपल्या कडोसरीचे तमाखू आणि कुड्याचें पान काढून विडी बनवायला सुरवात केली. विडी तयार करतां करतां ते म्हणाले, " पोरगा मोठा हुषार आहे. नव्या नव्या तऱ्हेच्या न् नक्षीच्या दगड्या, पेले करतो. चिनी मातीच्या भांड्यापेक्षां सरस. पण या ओसाड गांवांत चीज नाहीं. चार पैसे मिळतील ते खंडापायीं न् व्याजापायीं कुळकर्ण्याच्या घशांत — "

" कोण हा कुळकर्णी ? बाळ्या ? — "

" नाहीं. बाळ्या मेला. त्याचा चुलतभाऊ दाजिबा ! भिकूची जमीन त्याच्याचकडे गहाण आहे. आज भिकूला खाणींतले दगड काढायला खंड द्यावा लागतो — " चकमकीनें तयार केलेल्या विस्तवानें विडी पेटवीत चाकरमानी म्हणाले.

त्यांनीं चांगले सपाटून दोनचार झुरके घेतले आणि विडी महादेवांपुढें केली. आणि म्हटलें, " आतां शिगरेट टाकून ही विडीच ओढायला शिक— "

महादेवांना वाटलें—ही विडी ओढणें कांहीं आपल्याला जुळायचें नाहीं. पण नाहीं म्हणण्याचा धीर त्यांना झाला नाहीं. मुकाट्यानें विडी मुठींत घेऊन तिला तोंड न लावतां त्यांनीं एक झुरका मारला. तो झुरका चांगला चरचरत त्यांच्या काळजाला जाऊन भिडला आणि विडी ओढल्याचें समाधान वाटलें.

" कशी आहे ही गांवठी शिगरेट ?"

" समाधान वाटलं. आतां हीच ओढायची. शिकवून ठेव मला कशी करायची ती !"

महादेवांनीं विडी भिकूच्या पुढें केली तेव्हां चाकरमानी हंसून म्हणाले, " कशाला खोकून खोकून मरायला त्याला ? भगवान घे रे !"

भगवान उठला. त्यानें विडी हातांत घेतली आणि जवळच्या फणसाच्या झाडाच्या आड जाऊन तो झुरके घेऊन धूर सोडूं लागला.

महादेवांना हा विनयशीलतेचा प्रकार बऱ्याच वर्षांनीं पुनः पहायला मिळाल्यामुळें मोठें समाधान वाटलें.

" कायरे भिकू, कुळकर्ण्याकडे किती रकमेला गहाण आहे तुझं शेत ?" महादेवांनीं हळूच विचारलें.

" साडेचारशें—दीडशें होते आतां इतके झाले—"

" अरे बापरे ! कशी रक्कम एवढी फेडणार तूं ?"

इतक्यांत ढोलाचा आवाज ऐकूं येऊं लागला.

" काय बुवा, आज ढोल कां वाजतो ?" चाकरमानी उद्गारले.

" गांवसभा असेल—" भिकूनें उत्तर दिलें.

इतक्यांत गळ्यांत ढोल अडकविलेला महार रस्त्यावरून जात असलेला त्यांना दिसला. चाकरमान्यांनीं ओरडून विचारलें, " काय रे, गोंदनाका, ढोल कां रे वाजतो ?"

" दुपारीं गांवसभा आहे देवळांत—"

" आज कसली करताहेत ही गांवसभा ?" चाकरमानी स्वतःशींच बोलले, " महादेवा, आज तूंही ये देवळांत सभेला !"

" हो येईन. किती वाजतां ?"

" वाजतां कसले रे ? चार घटका दिवस राहिला कीं जाऊं—"

चाकरमानी जायला उठले. त्याबरोबर भगवान आणि भिकूही जायला उठले. त्यांना चार पावलें पोंचवून महादेव परत येत होते;

इतक्यांत कुणी तरी हांक मारली, " बाबा, अहो बाबा ! "

महादेवांनीं मागें वळून पाहिलें.

जाई उभी होती. तिच्या बरोबर काळू होता.

" बाबा, चला लवकर ! माझ्या दादाला कुळकर्णी न् फौजदारांनीं पकडून नेलं. चला लवकर—"

महादेव मुकाट्यानें तसेच त्यांच्या मागून चालूं लागले.

---

## मेलेली म्हैस ५

दाजिबा कुळकर्ण्यांची म्हैस आदले दिवशीं एकाएकीं मेली. जाईचा भाऊ अर्जुन, कुळकर्ण्यांचीं गुरें राखीत होता. त्यानेंच तिला वीष घालून मारलें असा कुळकर्ण्यांचा समज झाला. महारांनीं मांसाच्या लोभानें आपली म्हैस मारली, तेव्हां त्यांना मृत म्हैस नेऊंच द्यायची नाहीं असें त्यानें ठरवून मेलेलें जनावर नेऊं न देतां आपल्या शेतांत खोल खड्डा खणून पुरून टाकलें. त्यानें अर्जुनाला खूप छेडला, पण कांहीं उपयोग झाला नाहीं. एकदोन दिवसांत गुन्हा कबूल केला नाहींस तर पोलिसांच्या स्वाधीन करीन अशी त्याला तंबीही देऊन ठेविली.

दुसरे दिवशीं सकाळीं कुळकर्णी उठून पाहतो तों, शेतांत गिधाड, कावळे आणि गांवकुत्रे यांची ही गर्दी झालेली. तो धांवत तसाच गेला आणि त्याच्या दृष्टीला जो प्रकार दिसला त्यानें त्याच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन पोंचली.

खड्डा कुणी तरी उकरून काढला होता. मेलेली म्हैस गिधाड कावळे आणि कुत्रे चघळीत बसले होते.

त्याला वाटलें,—महारांचेंच हें काम. आपल्यावर सूड उगविण्यासाठीं त्यांनींच रात्रीं येऊन खड्डा उकरून टाकला असला पाहिजे.

ती कल्पना त्याच्या डोक्यांत येतांच अर्जुनाला खाऊं कीं गिळूं असें त्याला होऊन गेलें.

तो तडक तसाच महारवाड्यांत गेला. तेथें जाऊन त्यानें अर्जुनाची चौकशी केली. अर्जुन घरींच होता. त्यानें अर्जुनावर शिव्यांची लाखोली वाहिली. इतर महार तेथें जमा झाले त्यांचाही उद्धार केला आणि साऱ्यांना आत्तांच्या आतां तुरुंगांत नेऊन घालतों अशी धमकी दिली. अर्जुनाचें रक्त सळसळलें. आपला अपराध नसतांना, आपण मृत मांस खातही नसतां पुरलेली म्हैस बाहेर काढण्याचा आरोप आपणावर यावा याची त्याला चीड आली. त्यानें उत्तर दिलें,

" बामणा, तुला काय करून घ्यायचं तें करून घे ! तुझी म्हैस मीं बाहेर काढलेली नाहीं. कोणी काढली असेल तर तपास कर त्याचा. पुनः मला शिव्या देशील तर तोंड फोडून टाकीन—"

आपल्या घरच्या क्षुल्लक राखण्यानें आपल्याला तोंडांत मारीन असें म्हणावें, याची दाजिबा कुळकर्ण्याला चीड आली.

तो अर्जुनाला मारण्यासाठीं पायांतील वहाण हातांत घेऊन धांवला.

अर्जुनाच्या तोंडावर वहाणेचा प्रसाद बसला.

त्याबरोबर अर्जुन सर्पासारखा दाजिबाच्या अंगावर तुटून पडला.

पण इतर महारांनीं, ' हें काय, हें काय, ' करीत त्याला आंवरून धरला. त्याला त्यांनीं मागें खेचलें.

एक वृद्ध महार म्हणाला, " अर्ज्या, लेका, प्रत्यक्ष अन्नदात्याच्या अंगावर हात उगारतोस ? एवढा कशाला मान हवा तुला ? ज्यानं त्यानं आपल्या पायरीनं वागावं. किती शिकला सवरलेला असलास तरी महारच ! दाजिबा, जा तूं ! त्या पोराच्या नादाला लागूं नकोस ! "

" नादीं लागूं नकोस काय ? चांगला झोडपून काढणार आहें ! मुकाट्यानं कबुल करा. मांसाच्या खाजीसाठीं माझी म्हैस बाहेर काढलीत कीं नाहीं ? साऱ्या महारांना आतां पकडून नेतों. नाहींपेक्षां कबुल करा अगोदर ! "

सगळे महार चिंताक्रान्त झाले. आपणाला आतां पकडून नेणार याच

कल्पनेनें ते घाबरून गेले होते. ते आपापसांत बोलत होते; कोणी अर्जुनालाच दोष देत होते.

अर्जुन रागानें थरथरत होता. दाजिबाची मान पकडून त्याच्या नरडीचा घोंट घ्यावा असा त्याला चेव येत होता. पण कांहीं उपयोग नव्हता. सारेजण आपल्यावरच उलटतील याची त्याला खात्री होती. तो संयम करून स्वस्थ राहिला होता. अजूनही त्याच्या भोंवतीं महारांचें कोंडाळें होतें.

"जा रे फौजदाराला घेऊन ये!" दाजिबानें एका पोराला ओरडून सांगितलें. कुळकर्ण्याचा हुकूम अमान्य करणेंच शक्य नव्हतें. तें पोर फौजदाराला बोलावून आणण्यासाठीं निघून गेलें.

याच वेळीं जाई आपला भाऊ काळ्या याला बरोबर घेऊन महादेवांकडे गेली होती.

वाटेंत महादेवांना जाईनें सारी हकीकत सांगितली. आणि डोळ्यांत आंसवें आणून विचारलें, "माझ्या दादाला पकडून नाहीं ना नेणार बाबा?"

"नाहीं न्यायचे. पाहूं काय करतात तें!"

महारवाड्याजवळ महादेव येऊन पोंचले.

वीसपंचवीस झोंपडीवजा घरें दाटी दाटीनें तेथें त्यांना दिसलीं. कांहीं घरांच्या भिंती मातीच्या तर कांहीं कुडाच्या होत्या. घराचीं छपरें बहुतेक कैंबळ्यानें विणून घेतलेलीं होतीं. कांहीं घरांवर नळेही दिसत होते. दोन घरांच्या मध्यें फारच थोडें अंतर होतें. आजूबाजूला उकीरडा, घाण दिसली. पण असा उकीरडा आणि घाण खेड्यांत प्रत्येकाच्या घराच्या आजूबाजूला असतात. या बाबतींत महार आणि इतर सारखेच. बांबूच्या काठ्या व अर्धवट विणलेल्या टोपल्या, डाळ्या, परड्या प्रत्येकाच्या खळ्यांत दिसत होतीं.

अर्जुनाच्या घरासमोर गर्दी जमली होती.

सोमा फौजदार केव्हांच येऊन दाखल झाला होता. महादेव आले तेव्हां कुळकर्णी त्याच्या कानाशीं लागून कांहीं तरी सांगत होता.

महादेव येतांच दोघेही बाजूला झाले. फौजदारानें त्यांना रामराम केला. दाजिबा मात्र जणुं आपण पाहिलेंच नाहीं अशा बेतानें दुसरीकडे पाहात राहिला.

महादेवांना सगळीच मंडळी नवी होती. जाई आणि काळ्या यांच्याखेरीज त्यांच्या कुणीच परिचयाचें नव्हतें, त्यामुळें बोलण्याला कशी सुरवात करावी हें त्यांना समजेना.

आतां कांहीं तरी बोललेंच पाहिजे असें पाहून फौजदारानेंच सुरवात केली—

" तुम्ही आलां ? ठीक झालें ! या वेळीं कुणीतरी तिऱ्हाईतच हवा होता. तुम्हीच आतां तिऱ्हाइती करा याची." आणि कुळकर्ण्याकडे वळून फौजदार म्हणाले, " हे गांवचे कुळकर्णी दाजिबा. हा अर्ज्या महार. यानंच याची पुरलेली म्हैस बाहेर काढली—"

" म्हैस मीं बाहेर काढलेली नाहीं ! " अर्जुनानें मधेंच उत्तर दिलें.

महादेवांनीं ओळखलें. अर्जुन तो हाच. त्यांना अर्जुनाचा चेहरा अत्यंत आकर्षक वाटला. जाईच्या आणि त्याच्या चेहऱ्यांत किती तरी साम्य होतें. त्याचा वर्ण काळा होता तरी कांतीवर एक प्रकारचें तेज दिसत होतें. त्याचे डोळे पाणीदार मर्मभेदक, नाक सरळ, पांढरे शुभ्र दांत आणि चेहऱ्यावरील विलक्षण करारीपणा यामुळें महादेवांचें मत त्याच्याविषयीं प्रथमदर्शनींच अनुकूल झालें.

तो एकच वाक्य बोलला, पण त्याचा त्यांच्या मनावर अत्यंत अनुकूल असा परिणाम झाला.

" म्हैस यानंच बाहेर काढली यांत शंका नाहीं ! " दाजिबा बोलूं लागला, " माझ्या घरचा राखणा आहे हा. यानंच मांसाच्या लोभानं वीष घातलं — "

" बामणा, याला कांहीं पुरावा ? " अर्जुनानें विचारलें.

" प्रत्यक्ष मी सांगतों न् पुरावा काय अधिक ? "

" हं ! " अर्जुन तुच्छतापूर्वक हंसला.

" मेलेल्या जनावराच्या मांसाला दादा शिवतसुद्धां नाहीं. तो का तुझी म्हैस बाहेर काढणार आहे ? " जाई मधेंच म्हणाली.

" कुणाला सांगतेस या गोष्टी ? मला नको सांगूं. या महादेव ठाकुरांना सांग ! " दाजिबा म्हणाला.

" मोठी नवलाची गोष्ट आहे !" महादेव बोलूं लागले. " पुरलेली म्हैस बाहेर कुणी काढली ? अर्जुनाचं तर हें काम दिसत नाहीं !"

" कशावरून ? " दाजिबानें विचारलें.

" बरं अर्जुन, कुणी म्हैस बाहेर काढली असावी असा तुझा तर्क आहे ? मी तर अगदींच नवखा–तिऱ्हाईत आहें. तूंच सांग बरं तुझं म्हणणं काय तें ?"

अर्जुन हंसला. त्याला महादेवांच्या प्रश्नानें बरें वाटलें. आपल्यावर महादेवांचा विश्वासच आहे असें नाहीं, तर गुन्हा हुडकून काढण्याच्या बाबतींत ते आपली मदत घेत आहेत याचा त्याला अभिमान वाटला.

" म्हशीचा मुडदा कोणी बाहेर काढला हें मी कसं सांगणार ? म्हैस पुरतांना मात्र मी होतों. माझ्याच हातांनीं खड्डा खणला आहे. मींच इतरांबरोबर खड्ड्यांत माती लोटली आहे. पण आतां ती बाहेर कशी आली हें मी कसं सांगणार ? पण म्हैस खरोखरच बाहेर काढली गेली आहे का ?"

" म्हणजे ? मी खोटं सांगतों वाटतं ?" दाजिबानें विचारलें.

" तसं नाहीं. पण आतां न्यायच करायचा आहे तर प्रत्यक्ष ती जागाच सर्वांनीं पाहिलेली बरी. कांहीं हरकत नसेल तर आपण तिथें जाऊं !"

अर्जुनाची सूचना सर्वांना पसंत पडली आणि सर्वजण कुळकर्ण्यांच्या शेतांत जाऊन दाखल झाले.

तेथें अजूनही गिधाडें कुत्रीं आपली शिकार करीत होतीं. एवढी मंडळी आल्याबरोबर गिधाडें दूर पळून गेलीं. कुत्रे आजूबाजूला रेंगाळत राहिले.

सर्वांनीं पाहिलें. बाहेर मांसाचे आणि हाडांचे लहान मोठे तुकडे पडले होते. म्हशीच्या शरीराचा कांहीं भाग आंत खड्यांतच होता.

" आतां सांगा, हें कुणाचं काम ?" अर्जुन बोलूं लागला. " हें माणसांचें काम दिसत नाहीं. माणसांनीं–नव्हे महारांनीं म्हैस काढली असती तर ती अशी अर्धवट खड्ड्यांत ठेवली नसती. त्याचा केव्हांच फन्ना उडविला असता. येथें आंत, बाहेर तुकडे न् हाडें दिसताहेत. आंत तर भलें मोठें डोकें न् इतर मोठा भाग दिसतो आहे. यावरून तुम्हांला नाहीं वाटत, कीं हें कुणा तरी जनावरांचं काम असलं पाहिजे— "

" कोल्ह्यांचें हें काम ! " इतर महार ओरडले. " कोल्ह्याच असं काम करूं जाणे ! "

" मग काय कोल्ह्यांनीं उकरून काढली म्हैस ? " महादेव म्हणाले.

" यांत काय संशय ! "

दाजिबाचा चेहरा पडला होता.

" मला वाटतं अर्जुनाचं म्हणणं पटण्याजोगं आहे सर्वांना ! " महादेव म्हणाले.

" काय कुळकर्णी ? " फौजदारानें विचारलें.

" ही सगळी बनावट कादंबरी दिसते. न् तिन्हाइताचा या महारावर विश्वास. मला ही तिन्हाईती मंजूर नाहीं. " कुळकर्णीनें जाहीर केलें. " मी या अर्जुनाला तुरुंगाचीच वाट दाखविणार."

महादेव आपल्या रागाचें संयम करीत होते. त्यांना अर्जुन निर्दोष वाटत होता. दाजिबाचें उत्तर त्यांना उर्मटपणाचें वाटलें.

पण दाजिबा गांवचा कुळकर्णी होता. कुळकर्णी म्हणजे गांवचा सर्वशक्तिमान् राजा. तो सांगेल तें सत्य आणि देईल तो न्याय, अशीच आजवरची परंपरा. या परंपरेला बाध येईल असा आजचा प्रसंग होता. हा प्रसंग दाजिबाला कसा आवडावा ? आपण म्हणतों तेंच खरें झालें पाहिजे असें त्याच्या अभिमानी मनाला वाटलें.

" दाजीबा, जाऊं द्या आतां. कोल्हाकुत्र्यांनीं म्हैस उकरून काढली ही गोष्ट ढळढळीत दिसत आहे, तेव्हां कशाला बिचाऱ्याला तुरुंगांत घालतां ? न् हें प्रकरण कोर्टांत गेलं तरी कोर्ट त्याला तुरुंगांत घालीलच असं नाहीं. कदाचित् माझ्यासारखाच निर्णय देईल. न् उद्यां हें प्रकरण कोर्टांत गेलं तर माझी साक्ष होईल तिथं—" महादेव म्हणाले.

दाजिबा कांहीं बोलला नाहीं. मात्र महादेवांचें तंबीवजा बोलणें प्रभावी ठरलें. महादेव वकील आहेत, भलतेंच कांहीं तरी होऊन आपल्या अंगावर बाजू शेकायची, त्यापेक्षां हें प्रकरण इथेंच मिटविलेलें बरें असें त्याला वाटून त्यानें उत्तर दिलें,

" आपल्या सारख्यांची इच्छाच असली तर माझी ना नाहीं कांहीं. अर्जुनाला मी एक वेळ सोडून देत आहें—"

त्यानें महादेवांकडे पाहिलें. नंतर फौजदाराकडे पाहिलें. फौजदाराकडे पाहिलें तेव्हां फौजदारानें त्याला डोळा घातला. त्याचा अर्थ काय तो दाजिबा समजला. तो पुढें म्हणाला, " या भानगडींत फौजदारांना निष्कारण त्रास पडला आहे. त्यांचा भाग त्यांना दिला पाहिजे. अर्जुनानें त्यांना सव्वा रुपया द्यावा, मी पांच देईन—"

महादेवांनीं ओळखलें काय तें. त्यांनीं खिशांत हात घालून फौजदाराच्या हातावर कांहीं नाणीं टाकलीं.

अर्जुनाला हा प्रकार आवडला नाहीं. तो विरोध करण्यासाठीं पुढें येत होता पण महादेवांनीं त्याला डोळ्यांचा इषारा देऊन गप्प बसविलें.

---

## बापाचें पांघरूण ६

त्या दिवशीं देवळांतून परत आल्यावर महादेव अत्यंत खुषींत होते. देवळांत गांवकऱ्यांनीं त्यांचा चांगलाच सन्मान केला होता. प्रत्येकजण त्यांची विचारपूस करीत होता. त्यांच्यासारखा मोठा माणूस आपल्या गांवांत येऊन राहात असल्याबद्दल त्यांनीं आनंद दाखविला होता. आणि खेड्यांत कुणीही मोठा माणूस गेला कीं त्याच्याबद्दल अशीच आस्था दाखविला जाते. विशेषतः त्याच्याजवळ जर चार पैशांची माया असली, तो श्रीमंत आहे असें गांवांतल्या लोकांना कळलें तर बघायलाच नको. साऱ्या दुनियेंत त्याच्या सारखा थोर कुणीही नाहीं असें त्यांना वाटत असतें. आणि गुळाच्या ढेपीजवळ जसा डोंगळ्यांचा जमाव जमतो तसे लोक त्याच्या अवतीभवतीं नेहमींचेच असतात.

महादेवांबद्दल आधींच गावांत कीर्ति पसरली होती. ते मुंबईला एक मोठे वकील होते; सध्यां कंत्राटदाराचा धंदा करून खोऱ्यांनीं पैसा ओढतात, मुंबईत त्यांच्या किती तरी चाळी आणि बंगले, मोटारी आहेत; त्यांचा एकुलता एक मुलगा विलायतेला बॅरिस्टर व्हायला गेला आहे वगैरे हकिकती आतां गांवांतल्या पोरासोरांनाही माहित झाल्या होत्या.

म्हणूनच ते देवळांत सभेला येतांच प्रत्येकाला आनंद झाला. त्यांच्याशीं ओळख दृढ करून घेण्याची प्रत्येकजण घडपड करूं लागला होता.

देवळांत सभामंडपाच्या दुरुस्तीच्या कामासाठीं गांवावर पट्टी बसवून पैसे

वसूल करण्यासाठीं सभा बोलावली होती. दर घरामागें आठ आणे, रुपया पट्टी बसवून दीडदोनशें रुपये जमा करायचे होते. दीडदोनशें रुपयांचीच बाब आहे तेव्हां हा सारा खर्च आपण देऊं, कुणाकडूनही पट्टी वसूल करूं नये असें महादेवांनीं सांगितलें; तेव्हां साऱ्यांचे चेहेरे कसे फुलून गेले. दाजिबा कुळकर्ण्याला महादेवांचें औदार्य सहन झालें नाहीं तरी, आपला एक रुपया वांचला याचा त्याला आनंद झाल्यामुळें हा विषाद फारसा जीव धरून राहिला नाहीं. महादेवांनीं एक अट मात्र घातली. गांवांतील लोकांसाठीं एक शाळा काढण्याचा आपला उद्देश आहे आणि ही शाळा भरविण्यास देवळाची जागा द्यावी; गांवकऱ्यांनीं आपलीं मुलें शाळेंत पाठवावीं. ही अट सगळ्यांनीं आनंदानें मान्य केली. महादेवांना धन्यवाद मिळाले.

आणि याचाच महादेवांना फार आनंद झाला होता. आपल्या गांवाची सेवा करण्यासाठीं ते सारा व्याप सोडून मुंबईहून वनगांवाला आले होते. असहकारितेची चळवळ जोरांत सुरू होती आणि त्यांची वकिलीही त्याच दरम्यान जोरांत चालली होती. कोंकणांतील लोकांच्या उपमेनें बोलायचें म्हणजे ते अक्षरशः खोऱ्यांनीं पैसे ओढीत होते. त्यांचे बरोबरीचे कित्येक वकील धंदा सोडून स्वातंत्र्याच्या चळवळीला जाऊन मिळाले होते. पण महादेवांना पैशाचा मोह सोडवला नाहीं. हालअपेष्टा सहन करून शिक्षण घेतलें तें दारिद्र्यांत राहाण्यासाठीं नव्हे, असें ते म्हणत असत. स्वताच्या कर्तबगारीवर खूप पैसा मिळवायचा अशी त्यांची महत्त्वाकांक्षा होती. त्यामुळें ते वकिलीच करीत राहिले; खूप पैसा मिळवीत राहिले.

पण त्यानंतर कांहीं दिवसांनीं जी घटना घडून आली तीमुळें त्यांनीं बाणेदारपणें आपल्या वकिलीच्या धंद्यावर लाथ मारली.

सत्याग्रहाची चळवळ ऐन रंगांत होती, त्या वेळीं एका बड्या देशभक्ताचा खटला कोर्टांत चालू होता. कोर्टांतील गर्दीचा त्रास चुकविण्यासाठीं कोर्टांत पोलिसांचा आणि सार्जंटांचा कडेकोट बंदोबस्त ठेविला होता. तो खटला ऐकण्यासाठीं महादेव ठाकूर मुद्दाम आपल्या कोर्टांतून त्या कोर्टांत गेले. पण त्यांना आंत दरवाजावरच अडविण्यांत आलें. दरवाजावर

असलेला सार्जंट त्यांना आंत सोडीना. आपण वकील आहों आणि कोर्टाच्या कामाच्या वेळांत वाटेल तेव्हां आंत जाण्याचा आपला अधिकार आहे असें त्यांनीं सार्जंटाला दरडावून सांगितलें. पण त्या आडदांड सार्जंटची समजूत पटेना. तो त्यांना आंत सोडायला तयार झाला नाहीं. इतकेंच नव्हे तर तेथून लगेच निघून न गेल्यास धक्की मारून बाहेर घालवून देईन, अशीही धमकी त्यानें दिली. महादेव ठाकुरांना हा अपमान सहन झाला नाहीं. त्यांनीं मोठ्या संयमानें आपला राग आवरला. पण तिथून निघून जाणें त्यांना अपमानकारक वाटलें. त्यांनीं निघून जाण्याचें साफ नाकारलें. ते तेथेंच उभे राहिले.

ते तेथून जात नाहींत असें पाहून त्या उन्मत्त गौरकाय सार्जंटानें त्यांना ढकलून दिलें. ढकलून दिलें त्यामुळें महादेव ठाकूर–मुंबईच्या कोर्टातील फौजदारी खटले चालविणारे एक नामांकित वकील–दादरावरून खालीं कोसळून पडले.

त्यानंतर ते पुनः कधीं कोर्टाची पायरी चढलेले कुणाला दिसले नाहींत. सार्जंटाविरुद्ध त्यांच्या वकील मित्रांनीं सरकारकडे तक्रार केली, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

महादेव ठाकुरांनीं मग कॉन्ट्रॅक्टरचा धंदा सुरू केला. अनेक प्रकारचीं कंत्राटें घेऊन त्यांनीं त्यांतही अपरंपार पैसा मिळविला. या दरम्यान असहकारितेची चळवळ थोडी थंडावली होती. महादेव ठाकुरांच्या मनावर तिचा अनुकूल परिणाम होण्याचा समय त्यामुळें प्राप्त झाला नाहीं. पुढें १९३० सालांत चळवळीनें पुनः उग्र स्वरूप धारण केलें. आणि बोरीबंदरजवळ पंडित मदन मोहन मालवीय यांच्या सारखा अखिल हिंदुस्तानाला पित्यासमान असणारा ऋषितुल्य महापुरुष तेथें पोलिसांनीं अडविलेल्या प्रचंड जमावांत सारी रात्र अग्रभागीं बसून राहिलेला त्यांनीं आपल्या डोळ्यांनीं जेव्हां पाहिला तेव्हां त्यांच्या मनाची स्थिति चमत्कारिक होऊन गेली. त्यांच्या अंगांतील रक्त सळसळून उठलें. देशासाठीं आपणही कांहीं तरी केलें पाहिजे असें त्यांना तीव्रतेनें वाटूं लागलें.

आणि त्यानंतर मुंबई शहरांत एकामागून एक घडणारे लाठीमार, विक्रोळीच्या जंगलांतील सत्याग्रही स्त्रियांसंबंधींचा प्रकार यांनीं त्यांचें मन उद्विग्न होऊन त्यांनीं मनाशीं निश्चय केला, आतां कांहीं झालें तरी माघार म्हणून घ्यायची नाहीं.

त्यानंतर एकदां महात्मा गांधींचा मुक्काम मुंबईत मणिभुवनांत होता.एके दिवशीं महादेव टाकूर त्यांच्या भेटीसाठीं गेले आणि देशसेवा करण्याचा आपला इरादा त्यांना निवेदन केला. महात्माजींनीं त्यांना प्रत्यक्ष धकाधकीच्या चळवळींपेक्षां खेड्यापाड्यांत जाऊन लोकशिक्षणाचें विधायक कार्य करण्याचा सल्ला दिला.

त्याप्रमाणें महादेव ठाकूर आपल्या गांवांत–वनगांवांत–मातृभूमीची सेवा करायला येऊन दाखल झाले होते. त्यांचा मुलगा जगन्नाथ विलायतेला उच्च शिक्षणासाठीं गेला होता. पत्नी पूर्वींच मरण पावली होती. आतां त्यांच्या मागें तसा कांहीं कौटुंबिक पाश नव्हता. त्यामुळें त्यांना मुंबईचा पसारा आवरून वनगांवाला येणें सहज शक्य झालें होतें.

देवळांतून सभेहून परत आल्यावर त्यांना या साऱ्या गोष्टींची पुनः पुनः आठवण होत होती. आपल्या इच्छेप्रमाणें आपल्या गांवांत लोककार्य करायला मिळणार याचा आजच्या अनुभवानें त्यांना आनंद होत होता.

एकदां शाळा सुरू झाली म्हणजे एकदोन वर्षांच्या अवधींत सारा गांव साक्षर करून टाकतां येईल असें त्यांना वाटलें.

देवळाच्या दुरुस्तीचें काम लगेच हातीं घ्यावें म्हणजे शाळा लवकर सुरू करतां येईल, असें त्यांना वाटलें. त्यांनीं लगेच भगवान् सुताराला जाऊन भेटायचें टरविलें.

ते भगवानाच्या घरीं येऊन दाखल झाले तेव्हां नुकताच काळोख पडूं लागला होता.

महादेव टाकूरांचें घर एका उंचवट्यावर होतें. तो उंचवटा उतरून फर्लांग दीड फर्लांग अंतरावर गेलें, कीं नदीकांठीं सुतारवाडा लागे. तेथेंच एका टोंकाला भिकू सुताराचें घर होतें. सुतारवाड्यांत पंधरावीस घरें अलग अलग होतीं.

प्रत्येकाच्या घरासमोर पांढऱ्या दगडांच्या राशी पडलेल्या होत्या. तेथेंच दगडी भांडीं करायचे चरक जमिनींत पुरलेले होते. बाजूला प्रत्येकाच्या सुतारशाळा होत्या. प्रत्येक घराला परसूं होतें. परड्यांत कोरांटी, आबोलीचीं झुडपें आणि तुळशीचीं रोपटीं दिसत होतीं. कुठें कुठें पांढरा चांफा फुललेला दिसत होता. घरें जुनाट होतीं. तांबड्या पिंवळ्या मातीनें भिंती सारविलेल्या होत्या.

भिकूचें घरही अशाच प्रकारचें एक होतें. कोळोखामुळें तेथील वातावरणाचें वैशिष्ट्य विशेष ठळकपणें दिसून येत होतें.

महादेव ठाकूर तेथें आले तेव्हां त्या वातावरणाचा परिणाम त्यांच्या मनावर झाल्यावांचून राहिला नाहीं. त्यांनीं हांक मारली, “ भिकू, भिकू ! ”

त्यांना कुणीही उत्तर दिलें नाहीं. म्हणून त्यांनीं पुनः हांक मारली, “ भगवान् ! भगवान् ! ”

तरीही कुणी उत्तर दिलें नाहीं. घरांत अंधुक प्रकाश दिसत होता, तेव्हां घरांत कुणी तरी असलेंच पाहिजे असा महादेवांनीं तर्क केला. ते तडक आंत गेले आणि त्यांनीं आंत डोकावून पाहिलें. अगदीं दूरवरच्या खोलींत दारावर एक घासलेटाचा डबा पेटत होता. त्याच्या धूसर उजेडांत त्यांनीं पाहिलें–भगवान् आणि कोणी तरी एक स्त्री वावरत आहेत. ती काय काम करीत आहेत हें दुरून स्पष्टसें दिसत नव्हतें. तिचा चेहरा अंधुक दिसत होता.

भिकूच्या घरीं कोणी स्त्री असेल याची महादेवांना कल्पना नव्हती. ते मागें वळले आणि त्यांनीं पुनः हांक मारली, “ भिकू, भगवान् ! ”

कुणी तरी ओ दिल्याचें आतां त्यांच्या कानीं आलें.

थोड्या वेळानें भिकू सुतार काठी टेकीत टेकीत बाहेर येऊन महादेवांना पाहून उद्गारला, “ कोण महादेव ? या वेळीं ? कुठं गेला होतास ? कांहीं काम होतं का ? ”

“ तसं कांहीं काम नाहीं. पण देवळाच्या दुरुस्तीच्या कामासाठीं आलों होतों. काम एकदां लवकर सुरू होतं म्हणजे शाळेच्या कामाला लगेच सुरवात करतां येईल. त्यासाठीं भगवानाला विचारायला आलों होतों. ”

" एवढंच ना ? त्यांत काय आहे, हवं तर उद्यांपासून सुरू करतां येईल. पण उभा कां तूं ? बैस ना—या घोंगडीवर बैस ! "

दोघेही ओटीवर बैठक मारून बसले.

" भिकू, तुझ्या घरांत बायको माणूस कोण रे ? "

" अखेर तूं पाहिलंसच का ? " भिकू आश्चर्यानें म्हणाला, " आतां तुझ्या-पासून गुप्त तरी कसं ठेवायचं ? पाहिलं म्हणतोस मग काय ? "

" तसं कांहीं सांगण्यासारखं नसलं तर नको सांगूंस ! "

" छे ! छे ! तुला सांगायला काय हरकत आहे ! या पोरानं अलिकडे ताळतंत्रच सोडला आहे. भगवान हल्लीं माझ्या कह्यांत नाहीं. मला जुमानीत नाहीं तो. त्या पोरटीला असा मधूनमधून चोरून घेऊन येत असतो. "

" कुणाची पोरटी ? "

" कुणाची, काय कपाळ ! " स्वतःशींच बोलत भिकू म्हणाला, " न् पोराचा तरी काय गुन्हा ? या वयांत असं चालायचंच ! कसा दम धरावा तरी पोरानं ? दुर्लक्ष करतों झालं. कानउघडणी करायला मन धजत नाहीं. लग्न करून द्यायचं नशिबांत पाहिजे ना बाबा माझ्या ! "

महादेव निघाले तेव्हां वाटेंत विचार करीत होते—बाप मुलाच्या पापावर पांघरूण घालूं शकतो—नव्हे त्याला तसं उत्तेजन देतो याचं प्रत्यंतर आज पहायला मिळालं. भगवानाचं लग्न होत नाहीं याचं भिकूला दुःख होत आहे. मुलाच्या मनाचा कोंडमारा त्याला सहन होत नाहीं.

ती स्त्री कोण होती ? भगवानचा न् तिचा काय संबंध ? मघाशीं उजेडांत तिचा चेहरा स्पष्टसा दिसला नाहीं. खाणींत भगवानाच्या बाहुपाशांत जी तरुण स्त्री होती ती तर ही नसेल ? हो, हो, तीच—तीच. आतां आठवलं.

महादेवांना वाटलें तीच तरुणी असली पाहिजे आतां दिसली ती.

---

## महार मास्तर ७

पाडव्याच्या मुहूर्तावर रामेश्वराच्या देवळांत शाळेची सुरवात झाली. त्या दिवशीं गांवांतील साऱ्या मुलांना जमवून महादेव ठाकुरांनीं पाटी, पेन्सिल आणि खाऊचा पुडा बक्षिस दिला.बक्षिस समारंभ सुरबा चाकरमानी यांच्या अध्यक्षतेखालीं साजरा झाला. खाऊच्या आशेनें गांवांतील झाडून सारीं मुलें जमा झालीं होतीं. त्यांत मुलगे होते, तशा मुलीही होत्या. मुलांच्या रांगा करून त्यांचे लगेच वर्ग केले आणि त्यांना श्रीगणेशाचा धडा गिरवायला सांगितला. प्रथम खाऊचा पुडा मुलांना मिळाला. नंतर पाट्या आणि पेन्सिली. महादेवांनीं मुलांना इसापनीतीमधील चटकदार गोष्टी सांगून त्यांचें चित्त रमेल असें केलें.

हा प्रकार मुलांना अगदीं नवीनच होता. कांहीं तरी नवीन करायला मिळत आहे, यानें मुलें खूष होऊन गेलीं. गोड गोड खाऊ हातीं पडतांच त्यांनीं त्याचा समाचार घेण्यास अगोदर सुरवात केली. त्यानंतर त्यांना गोड गोड गोष्टी ऐकायला मिळाल्या, त्यामुळें कोणत्याही प्रकारें आढेवेढे न घेतां त्यांनीं श्रीगणेचा धडा गिरवायला सुरवात केली.

मुलांना हा प्रकार अभिनव होताच, पण मोठ्यांनाही तो होता. हा समारंभ पाहाण्यासाठीं लोकांची गर्दी झाली होती. महादेवांना तो देखावा पाहून मोठें समाधान वाटलें. आपल्या कार्याची सुरवात तर मोठी चांगली होत आहे असें त्यांना वाटलें. जमलेल्या मुलांत साऱ्या जातीचीं मुलें होतीं. त्यांत ब्राह्मणांचीं

मुलें होतीं, मराठ्यांचीं होतीं, सुतारांचीं होतीं, भंडाऱ्यांचीं होतीं—तशीं महारांचींही होतीं. महारांचीं मुलें दूर दूर राहात होतीं. सारींच मुलें निसर्गाचीं अनुयायी होतीं. ब्राह्मण मराठे यांचीं मुलें लंगोटी आणि सदरा पेहेरून आलेलीं होतीं तरी त्यांचें दैन्य त्यांतही डोकावल्यावांचून राहात नव्हतें. इतर जातींच्या मुलांच्या अंगावर धड कपडाही नव्हता. जो होता तो ओंगळ होता. मलिनतेनें त्याचा मूळ रंग ओळखतां येत नव्हता. हजार ठिकाणीं त्यांना ठिगळें लावलीं होतीं.

तें दृश्य पाहून महादेवांचें अंतःकरण भरून आलें. त्यांच्या डोळयांत अश्रू आल्यावांचून राहिले नाहींत.

त्यांची ती स्थिति पाहून सुरबा चाकरमानी म्हणाले, " महादेव, आम्ही रोजचंच पाहातोंय् हें. त्यामुळें आमची दृष्टि मेली आहे. तूं आजच पहातो आहेस, मुंबईच्या मोठ्या नजरेनें पाहातो आहेस; त्यामुळें तुझ्या डोळयांना हें दैन्य खुपलं न् अश्रु आले. हें तर कांहींच नाहीं. या पोरांच्या घरांत जाऊन पाहाशील तर तेथें दैन्याचा पर्वत दिसेल तुला. त्यांत ब्राह्मण, महार असा भेद नाहीं. दारिद्र्य दोघांनाही समानतेनें वागवितं ! "

" यासाठीं कांहीं तरी उपाय योजला पाहिजे. गांधींच्या मार्गानं गेलं पाहिजे. उद्योगधंद्याविना रिकामटेकडे बसणाऱ्या लोकांच्या हातीं चरखा न् कापूस दिला पाहिजे. चरखा त्यांना दोन वेळां दोन घांस का होईना, पोटाला देईल. त्यांना लाज राखण्यापुरतें वस्त्रही देईल ! "

" चरखा ? चरख्यानं काय होणार आहे ? जिथं आभाळच फाटलं आहे तिथं तुझ्या खादीचं ठिगळ काय करणार, कपाळ ! "

" चरख्याचं सामर्थ्य तुला माहीत नाहीं सुरबा ! आपल्या या दुर्दैवी देशांत आज चरखा शोधून सांपडायचा नाहीं. पण ज्या वेळीं आपलं राज्य होतं त्या वेळीं खेड्यापाड्यांत घरोघारीं चरखाच फिरत होता. गांवचा कोष्टी चरख्यावरील सुताचं आपल्या हातमागावर कापड विणून गांवाच्या वस्त्राची गरज भागवीत होता. इंग्रजांच्या राज्यानं तो मनु पालटला. चरखा गेला—

सारंच गेलं. टीचभर कापडासाठीं विलायतेच्या—मुंबईच्या तोंडकडे बघावं लागतंय्. जोंवर गांवांतल्या गांवांत कपडा तयार होत होता तोंवर तो स्वस्तही मिळत होता."

" मग काय चरखा हातांत घ्यायचा विचार आहे का तुझा ? पण चरखा कसा फिरवायचा तें कुणाच्या बापाला तरी माहित आहे का ?"

" मला माहित आहे. मी शिकवीन—"

" हे गांधींचे चाळे आमच्या गांवांत नकोत. एक शाळा निघतेय् तेवढी बस्स आहे. अशानं उगाच गांवावर सरकारची अवकृपा व्हायची; काय फौजदार ?" दाजिबा म्हणाले.

" यांत सरकारची अवकृपा व्हायची काय जरूर ? आम्हाला कपडा पाहिजे म्हणून सूत काढायचं, यांत सरकारला वाईट वाटायचं कांहीं कारण नाहीं. शेती करायला सरकारची बंदी असते का ? मग सूत काढून कपडा बनवायला कां असेल ?" महादेवांनीं सांगितलें.

" पण ही खादी आहे ना ?" फौजदार म्हणाला.

फौजदाराला कामानिमित्त तालुक्याच्या ठिकाणीं नेहमीं जावें लागे. तेथें शहरांत चाललेल्या सत्याग्रहाच्या चळवळी त्यानें पाहिल्या होत्या. ते चळवळे खादीवाले असतात; खादीवाल्या चळवळ्यांना सरकार पकडून तुरुंगांत पाठवितें; तेव्हां खादी म्हणजे कांही तरी 'भयंकर' गोष्ट आहे अशी त्याची कल्पना झाली होती. या कल्पनेंतूनच त्याची वरील शंका निर्माण झाली होती.

" खादी निरुपद्रवी आहे. सरकारला कांहीं घाबरण्याचं कारण नाहीं. माझा वकिली सल्ला ऐका फौजदार !" महादेवांनीं हंसत सांगितलें.

त्यांचें हें बोलणें चाललें आहे, इतक्यांत मुलांचा गोंगाट त्यांच्या कानीं पडला. एक महाराचा मुलगा बाजूला राहून रडत होता.

" काय झालं बाळ तुझं ?" महादेवांनीं विचारलें.

तो मुलगा आणखी रडूं लागला.

महादेवानें चौकशी केली. तिचें तात्पर्य असें होतें: महारांचीं मुलें आपण

होऊन निराळीं बसलीं होतीं. एका मराठ्याच्या मुलाला त्याचा चुकून कुठें स्पर्श झाला, तेव्हां तो मुलगा शिवाशिवी झाली म्हणून रागावला. त्यानें महार मुलाच्या तोंडांत मारली.

"या म्हारड्यांना शाळा काय करायचीय् !" फौजदार त्या मुलावर खेंकसून ओरडला. ज्या मुलाला महाराचा स्पर्श झाला होता तो त्याचाच मुलगा होता.

या प्रसंगानें काय करावें तें महादेवांना समजेना. त्यांनीं कशीबशी समजूत काढली, आणि मुलांना आपापल्या जागेवर बसण्यास सांगितलें. सतत एक महिनाभर शाळेंत येणारांना एक एक पैरण बक्षीस मिळेल—असेंही त्यांनीं जाहीर केलें. त्यामुळें शिवाशिवी प्रकरण तेथेंच मिटलें. मुलें पुनः आनंदांत गर्क झालीं.

पण फौजदारांचा मुलगा अस्वस्थ झाला होता. शिवाशिवीनें त्याला बाजूला बसावें लागलें होतें. तो रागानें महार मुलाकडे पहात होता.

त्या दिवसापासून शाळेचें काम सुरळीत चालू झालें. महादेव स्वतः मुलांना शिकवीत होते. त्यांनीं मुलांचीं मनें चटकन् वश करून घेतलीं. महार मुलांस शिकविण्यासाठीं त्यांनीं अर्जुनाची नेमणूक केली होती. मास्तरची नोकरी मिळाल्यामुळें अर्जुन खुप झाला. मनाजोगें काम मिळालें, याचा त्याला आनंद वाटत होता.

दाजिबा कुळकर्ण्याच्या म्हैस प्रकरणापासून तो त्याच्याकडून निघाला होता. लगेच त्याला शाळा मास्तरची नोकरी मिळाली. दाजिबाला वाटलें–साऱ्या गोष्टी महादेवामुळेंच होत आहेत. महादेव नसते तर अर्जुनाची काय बिशाद होती आपली नोकरी सोडून जायची ? त्याला महादेवांचा मत्सर वाटूं लागला. गांवांत आतां महादेव ठाकुरांचें महत्त्व वाढूं लागलें, आणि दाजिबा कुळकर्ण्याचें महत्त्व तसतसें कमी होऊं लागलें, याचा प्रत्यय त्याला येत होता. अर्जुन तर त्यांना जाऊन मिळाला. सुतार लोक त्यांच्याच भजनीं लागले आहेत. सुरबा चाकरमानी तर महादेवांचा बालमित्र. दिवसेंदिवस आपलें महत्त्व आतां कमी होत जाणार हें दाजिबाला स्पष्ट दिसूं लागलें.

त्यानें विचार केला—असं होऊन उपयोगाचं नाहीं. आधींच दिवसें दिवस परिस्थिति ठीक नाहीं. त्यांत आपलीं कुळेंही आपल्याशीं चांगलीं नाहींत असें झालें तर राहायलाच नको गांवांत. सुतार मंडळी दाजिबाच्याच जमिनींत खाणी पाडून दगड काढीत. दाजिबाची शेतीही ते खंडानें करीत. त्यांचा खंड बराच थकला होता. भिकू सुताराची तर जमीनच गहाण पडली होती त्याच्याकडे. त्यानें सुतारांना त्रास देऊन आपल्या बाजूला वळवून घेण्याचें ठरविलें.

गांवांतील लोक अन्नवस्त्राला महाग झाले आहेत हें महादेवांनीं ओळखलें होतें. त्यावर खादीचा तोडगा योजण्याचें त्यांनीं ठरविलें. जेवढीं माणसें चरखा चालविण्यास अनुकूल असतील त्यांना प्रथम चरखा चालवायला द्यायचा, शहरांतून एखादा कोष्टी आणून त्याला गांवांत माग चालवायला बसवायचें आणि गांवांतली कापडाची गरज भागवायची असा त्यांचा हेतू होता. गांवांत रिकामटेकडे लोक खूप होते. पावसांत चार महिने शेती केल्यावर बाकीचे आठ महिने स्वस्थ बसून चकाट्या पिटण्यांतच बहुतेक लोकांचा वेळ जाई. गांवकर मानापमानाच्या कैफांत गुंग असायचे. गांवाबाहेर नदीकांठीं चहाच्या हॉटेलांत सारा दिवस पडून रहायचें हाच त्यांचा उद्योग होता. नदीच्या पाण्यावर उन्हाळी शेती करण्याचे श्रम त्यांना नको होते. कुणा कुणाचीं मुलें आणि इतर आप्त मुंबईला गिरण्यांतून काम करीत होतीं त्यांच्याकडून महिनाकांठीं कांहींना कांहीं तरी ‘ पेन्शन ’ येई, त्यावर चैन करायची हाच त्यांचा कार्यक्रम असे. गांवांतील तरणेताठे लोक मुंबईच्या गिरण्यांत राबत होते, त्यामुळें गांवाचें वैभव नाहींसें झालें होतें आणि उरलेलीं माणसें त्यांच्या जिवावर आळशीपणांत दिवस घालवीत होतीं. इतर जीं कांहीं माणसें होतीं त्यांना काम नव्हतें. महारांना आणि सुतारांना गिऱ्हाईकच नव्हतें. दुसऱ्या कांहीं जातींना काम नाहीं म्हणून स्वस्थ बसावें लागत होतें.

या रिकाम्या लोकांच्या हातीं जर चरखा दिला तर रोजीं आणा दीड आणा का होईना त्यांच्या हातीं पडेल, त्यांचा वेळ सत्कारणीं लागेल, गांवांतल्या गांवांत वस्त्र भरपूर मिळेल असें त्यांना वाटलें.

त्यांनीं लगेच भगवान सुताराला चरखे बनवायचें काम दिलें. भगवान रात्रंदिवस राबून चरखे बनवूं लागला. जसजसे चरखे बनत होते, तसतसे ते

निवडक मंडळींच्या हातीं दिले जात होते. देवळांत चरख्याचा वर्ग भरत होता. महादेव शिक्षण देत होते. मुंबईहून मुद्दाम कापूस मागविला होता आणि कपाशी आणून कापसाचीं झाडेंही लावलीं जात होतीं.

दाजिबाच्या अंगाचा तिळपापड होऊं लागला. फौजदार मनांतून घाबरला होता. आपली फौजदारी जाते कीं काय अस भय त्याला वाटत होतें.

दीडदोन महिने सारा कारभार कसा सुरळीत चालला होता. शाळेंत मुलें शिकत होतीं. सायंकाळीं चरख्यावर सूत काढायला कांहीं प्रौढ मंडळी देवळांत येत होती. लोकांचा उत्साह जोरदार दिसत होता. कांहीं तरी नवीन करायचें आहे याची जिज्ञासाच याच्या मुळाशीं होती. केवळ पैशांच्या लोभानें फारच थोडी मंडळी येत होती. पण एकंदरींत येणारांची संख्या वाढत होती एवढें खास. त्यामुळें नवीन चरख्यांचीही जरूरी भासूं लागली होती.

त्यानंतर एके दिवशीं दुपारच्या प्रहरीं चरख्यांच्या चौकशीसाठींच महादेव ठाकूर भिकूच्या घरीं गेले होते. गेले तेव्हां त्यांच्या दृष्टीला अनपेक्षित प्रकार पडला. दाजिबा कुळकर्णी भिकूशीं भांडत होता. भिकू त्याची मनधरणी करीत होता. भिकूची जमीन दाजिबाकडे गहाण होती आणि तो दाजिबाच्या जमिनी-मधून चुनखडीचा दगड खंडानें काढीत होता. त्याबद्दलच दोघांमध्यें बोलाचाली चालली होती. दाजिबा आपल्या पैशांची मागणी करीत होता, आणि भिकू सांगत होता कांहीं दिवस दम धरायला. दाजिबाला कांहीं दम नव्हता. तो दम देण्यासाठींच आला होता.

" दाजिबा, किती रुपये देणं लागतो भिकू ? " महादेवांनीं विचारिलें.

" पांचशेंच्या दरम्यान होतील—"

" तडजोडींत भागण्यासारखं नाहीं का ?"

" कसली तडजोड करायची. आजवर व्याज सुद्धां दिलं नाहीं. "

" मूळ रक्कम घेऊन राजी कराल का ? "

" आहेत का भिकूजवळ पैसे ? का तुम्हीं पदरचे देणार ? "

“ भिकूला कर्ज देईन म्हणतों ! ”

“ म्हणजे, माझं कूळ उपटायचा बेत दिसतो ! छान ! ही तडजोड जमायची नाहीं ! ”

“ कर्ज म्हणून नाहीं–उसने म्हणून देईन. नाहीं तरी भिकू माझा बालमित्र न् पिढ्यान्‌पिढ्यांचा शेजारी नाहीं का ? ”

“ ठाकूर, असले व्यवहार करूं नका या गांवांत, पस्तावाल. हा भिकू एक पैही परत द्यायचा नाहीं, माहित आहे ? न् तुम्ही असे वागायला लागलांत कीं आमचा धंदा कसा चालायचा ? वडिलोपार्जित सावकारीवर आमचं चाललंय्. आमच्या पोटावर पाय का आणायचा बेत आहे तुमचा ? ”

“ पहा बुवा ! जमवून घ्यायचं असलं तर आतांच व्यवहार होऊं द्या पुरा !”

दाजिबानें पाहिलें–बाजू अंगावर उलटत आहे. भिकूला त्रास द्यायला आलों पण त्यांत महादेवांनीं विघ्न आणलें. त्यांनीं मनाशीं निश्चय केला–तसें कांहीं जुळूं द्यायंच नाहीं. त्यांनीं उत्तर दिलें.

“ पांचशेंत एक पैही कमी घेणार नाहीं ! ”

“ असं का ? बरं, पाहूं तर खरे कागद ! ”

दाजिबाचा नाइलाज झाला. कागद दाखविल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. त्यांनीं खिशांतून गहाणपट्ट्याचा कागद बाहेर काढला.

“ हें काय, सारे दीडशेंच दिसताहेत ! ”

“ व्याज, खंड, खंडाचं व्याज मिळून झालेच कीं—”

“ बरं, लिहा पाहूं पावती—भिकू खंडू सुतार याजकडून आजरोजीं पांचशें रुपये रोख पोंचले. गहाणखत सोडवून घेतलें–चालू सालापर्यंत खंड वगैरे बाकी कांहीं राहिली नाहीं—”

महादेवांनीं आपल्या घरीं दाजिबाला नेऊन पैसे मोजले. दाजिबानें मोठ्या कष्टानें सही केली.

भिकूची शेतजमीन गिळंकृत करण्याचा बेत ढांसळल्याबद्दल त्याला दुःख होत होतें.

दुसऱ्या दिवसापासून सुरबाच्या घरानजीक असलेल्या महादेव ठाकुरांच्या जागेंत भगवानानें नवी खाण पाडायला सुरवात केली. इतरही कांहीं सुतार त्याला मदत करूं लागले.

दाजिबा चिडून मनांतल्या मनांत जळूं लागला.

---

## मुलांचा खेळ ८

त्या महिना दीड महिन्यांतील काळूची शिक्षणांतील प्रगति पाहून महादेवांना आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. गुरें राखणारा आणि मासे गरवणारा महाराचा पोर, इतका बुद्धिमान निघेल याची त्यांना कल्पना नव्हती. त्या दीड महिन्यांत तो चांगला लिहूं वाचूं लागला होता. परंपरेमुळें शब्दोच्चार नीट करतां येत नव्हते, तरी तो महादेव बोलूं लागले, कीं त्यांचें भाषण नीट ऐके. त्यांच्यासारखें बोलण्याचा प्रयत्न करी. कठिण शब्दाचा उच्चार पुनः पुनः करून तो आत्मसात करण्याचा प्रयत्न करी. महादेवांना शंका विचारी. कधीं कधीं त्यांना प्रश्न विचारून भंडावून सोडी.

सुरबा चाकरमानीही शाळेंत येऊन मुलांना थोडेंथोडें शिकवूं लागले होते. ते महादेवांना म्हणाले, " पाहिलंस महादेव, महारांचीं मुलंही अशीं बुद्धिमान असतात. त्यांना आयुष्यांत संधि मिळत नाहीं म्हणून, नाहींपेक्षां तीं–तुम्हां भटाबामणांपेक्षांही हुशार असलेलीं दिसलीं असतीं. तूं आलास म्हणून गांवांतल्या पोरांना अक्षर ओळख होण्याचा तरी योग आलाय्—"

काळू अल्पावधींत चरख्यावरही चांगलें सूत काढूं लागला होता. महादेवांच्या बरोबर तो सदाच असे. त्यांच्याविषयीं त्याला विलक्षण आपलेपणा निर्माण झाला होता.

अर्जुन महारांच्या मुलांना शिकवी. महादेवांना कधीं सवड झाली नाहीं तर

तो इतर मुलांनाही शिकवी. इतर मराठे–ब्राह्मणांच्या मुलांना तो शिकवूं लागला कीं देवळांत येणाऱ्या जाणाऱ्या स्पृश्य लोकांना मोठें आश्चर्य वाटे. महार आणि शिकवतो याबद्दलचें तें आश्चर्य होतें. आश्चर्याचा भर ओसरला कीं गांवकरी लोकांना अर्जुनाचा मत्सर वाटे. त्यांना आपला पाणउतारा होत आहे असें वाटे. गांवचा फौजदार मधून मधून शाळेच्या बाजूला खेप टाकीत असे. अशा वेळीं आपल्या मुलाला एक महार शिकवितो याचें त्याला दुःख वाटे. त्याची स्वतःची विद्वत्ता सही करण्यापलिकडे फारशी नव्हती. आपण फौजदार असून आपणाला कांहीं येत नाहीं आणि हा महार धडाधड वाचतो याचें त्याला वैषम्य वाटे.

महादेवांना तो एकदां म्हणाला, "आम्ही मराठे गांवचे मानकरी. महारानं आमच्या मुलांना शिकवायचं म्हणजे काय ? असं चालायचं नाहीं. आधीं त्या महाराला बंदी करा !"

"फौजदार, महार झाला तरी तो शिकलेला आहे. गांवांत त्याच्या एवढा इतर जातींतही कुणी शिकलेला नाहीं. त्याच्या जातीकडे पाहून कसं चालेल ?"

दुसरे दिवशीं गांवकर मराठ्यांचीं मुलें शाळेंत यायचीं बंद झालीं.

महादेवांना मोठें दुःख झालें. त्यांनीं मोठ्या विनवणीनें फौजदाराची समजूत घातली; आणि मराठेमंडळीच्या मुलांना शाळेंत पाठवण्याची व्यवस्था केली. यांत फौजदाराला चिरीमिरी द्यावी लागली ती निराळीच.

महादेव अर्जुनाला म्हणाले, "अर्जुन, तूं आपला तुझ्या जातवाल्यांनाच शिकव. या लोकांना नाहीं हें पसंत. काय करायचं ? एक कार्य अंगावर मीं घेतलं आहे, तें असं मध्येंच टाकतां येत नाहीं."

अर्जुनाला मोठा अपमान वाटला. पण त्याला कांहींच बोलतां येत नव्हतें. एक तर त्याला महिना पगार मिळत होता. शिवाय महादेवांचा नाइलाज होता हें त्याला दिसत होतें.

पण त्याला अपमानाचें दुःख विसरतां येत नव्हतें. तो उगी राहिला, तसा मनांतल्या मनांत जळत राहिला.

अपमानित अंतःकरणानें तो घरीं आला. जाई त्याला म्हणाली, " अर्जुन, कायरे झालं ? चेहरा उतरला कां ? "

अर्जुनानें सारी हकीकत जाईला सांगितली. जाईच्या चेहऱ्यावर त्वेषानें लाली चढली. तिनें रागानें ओंठ चावले. ती अस्वस्थच झाली.

पण थोड्याच वेळानें ती शांत होऊन म्हणाली, " काय करणार बाबा ! आपण महार पडलों न् ते मराठी. तूं शिकला सवरलेला असलास तरी महारच. कांहीं झालं तरी जातच मोठी माणसापेक्षां."

" जाई, असं वाटतं; दूर कुठं तरी निघून जावं." अर्जुन त्वेषानें म्हणाला.

" कुठं जाणार ? कुठं गेलं तरी पळसाला पानं तीनच."

" मुंबईला जाईन—मुंबईत कोण कुणाची जात विचारीत नाहीं म्हणतात. कारकुनाची नोकरी नाहीं मिळाली तरी गिरणींत तरी नोकरी मिळेल ? "

" मुंबईला जाणार ? " जाई विचार करून म्हणाली, " जा ! जा ! या गांवांत कुजून मरण्यापेक्षां मुंबईत गेलेलं कांहीं वाईट नाहीं. तिथं उजळ माथ्यानं तरी वावरतां येईल. शिवाशिव झाली म्हणून कुणी ओरडणार नाहीं. तुझी जात हलकी कीं श्रेष्ठ म्हणून कुणी विचारणार नाहीं. पण मुंबईत कोण आहे आपलं ? तुला नोकरी कशी मिळणार ? आहे का कांहीं ? न् आम्ही इथं एकटीं कशीं राहाणार ? " जाईच्या डोळ्यांत पाणी आलें.

अर्जुनालाही बहिणीला सोडून जाण्याची कल्पना फारशी सुखकारक वाटली नाहीं.

" खरंच, तुम्हांला सोडून कसा जाणार मी ? कुठला जातोंय् ग. सहज आपलं वाटलं तें तुला बोलून दाखविलं—" अर्जुनानें तिची समजूत केली.

त्यानंतर पंधरावीस दिवसांची गोष्ट. दुपारीं शाळा सुरू होण्यापूर्वी लवकर आलेलीं मुलें लपंडाव खेळत होतीं. काळूही त्यांच्यांत होता. खेळ म्हटला कीं मुलें सारें कांहीं विसरतात. भूक तहान विसरतात. आईबाप, घर विसरतात. मग जात विसरलीं तर नवल नाहीं. खेळांत काळू त्यांना संवगडी हवा होता. त्याला शिवायचें नाहीं इतर वेळां, पण खेळांत शिवलें तर त्याची शिवाशिव

" बाप ? कुणाचा बाप काढतोस रे कुळकर्ण्या ? तोंड फोडून दांत पाडून टाकीन—"

अर्जुनाचें वाक्य पुरें व्हायच्या पूर्वींच दाजिबाच्या हातांतली काठी अर्जुनाच्या डोक्यांत बसली होती.

त्वेषानें अर्जुन पुढें धांवला. त्यानें कुळकर्ण्यांच्या हातांतील काठी हिसकावून घेऊन त्यानें तीनचार तडाखे कुळकर्ण्यांच्या पाठीवर लगावून दिले. कुळकर्णी गर्दीतून पळूं लागला.

महादेवांनीं काळूला तसेंच टाकून अर्जुनाला आंवरण्याचा प्रयत्न केला. अर्जुनाला शांत करून ते काळूला उठविण्यास गेले.

या दरम्यान काळूनें डोळे उघडले होते.

त्याला महादेवानें उठविलें आणि हाताला धरून ते देवळांत गेले.

" काय झालं ? काळू, तूं काय केलंस ? " महादेवांनीं देवळांत गेल्यावर काळूला आणि सर्वांना उद्देशून विचारलें.

अजून गर्दी कमी झाली नव्हती. लोक आपापसांत बोलत होते. काळूवर साऱ्यांचा रोष दिसत होता.

महादेवांनीं इतर मुलांकडून हकीकत काढून घेतली. इतक्यांत सुरबा चाकरमानीही तेथें येऊन दाखल झाले. त्यांना झालेली हकीकत सांगून महादेव म्हणाले, " सुरबा, आतां तूंच सांग यांतून कसा मार्ग काढायचा तो ! "

" महादेव, एकंदरींत प्रकरण बरंच कठीण दिसतं आहे. महार देवाला शिवलाय् तेव्हां गांवकरी चिडल्याशिवाय रहाणार नाहींत—पण घाबरूं नकोस. मी आहें. पाहून घेऊं काय होतं तें ! "

सुरबांच्या आश्वासनानें महादेवाचें दुश्चित्त झालेलें मन थोडें ताळ्यावर आलें.

महादेवांनीं साऱ्या मुलांना वर्गात बसण्यास सांगितलें. मुलें आपापल्या जागेवर जाऊन बसलीं.

अर्जुन स्वस्थ होता. तो कांहींच बोलला नाहीं. तो साऱ्या प्रकारानें गोंधळून गेला होता—चिडून गेला होता.

तासदीडतास स्वस्थ गेला असेल नसेल. फौजदार, दाजिबा आणि दोनचार गांवकर मंडळी देवळांत येऊन दाखल झाली.

फौजदारानें आल्याबरोबर प्रश्न केला, “ ठाकूर, हा काय प्रकार आहे ? देवळांत जाऊन देवाला भ्रष्ट करायला शिकवतां वाटतं महारांना ? ही शाळा आहे कीं मस्करी चालवली आहे ? गांवच्या कुळकर्ण्यावर दीड दमडीचा महार हात टाकतो न् तुम्ही हें उघड्या डोळ्यांनीं पाहातां ? ”

“ काय फौजदार, फारशी उर्मटगिरी चालली आहे ? ” सुरबांनीं प्रश्न केला; “ ठाकुरांशीं बोलतांना जरा सभ्य भाषा वापराल कीं नाहीं ? का फौजदारीचा माज आला आहे ? ”

“ चाकरमानी, तुम्ही या भागडींत न पडाल तर बरं. हें सरकारी काम आहे. न् सरकारी कामांत अडथळा आणूं नका. दाजिबांनीं फिर्याद दिली आहे माझ्याकडे—”

“ कसली फिर्याद दिली आहे ? ”

“ अर्जुनानें मारहाण केली. देवळांत महारानं भ्रष्टाकार केला—”

“ अर्जुनाचीही फिर्याद घ्या दाखल करून कीं, दाजिबांनीं त्याला अगोदर मारलं न् मग स्वसंरक्षणासाठीं अर्जुनाला हात उगारावा लागला.” सुरबा म्हणाले.

“ मीं अगोदर मारलं ? साफ खोटं ! साफ खोटं ! ” दाजिबा ओरडले.

“ कायरे पोरांनो, कुणी अगोदर मारलं ? ” सुरबांनीं वर्गांतील मुलांना विचारलें.

“ दाजिबांनीं अर्जुन मास्तरांना अगोदर मारलं ! ” मुलें एकदम ओरडलीं.

कुळकर्ण्याचा चेहरा खालीं पडला.

“ माराचं जाऊं द्या. त्याचा मागाहून इन्साफ करूं या ! पण आधीं देव भ्रष्ट झाला त्याचं काय ? ” फौजदार म्हणाला.

“ देव भ्रष्ट झाला ? कसं कळणार देव भ्रष्ट झाला तें ? देवालाच विचारलं पाहिजे तें ! चला बोलवा घाड्याला, देवाला कौल लावायला ? ” सुरबा म्हणाले.

" काळ्या देवळांत गेला ना ? मग त्यासाठीं कौल कां लावायचा ? महार देवळांत गेला, अर्थात् देव भ्रष्टच झाला."

" महाराच्या स्पर्शानं देव भ्रष्ट होतो मग महारणीच्या स्पर्शानं हे दाजिबा भ्रष्ट नाहीं होत ते ? "

दाजिबाचा चेहरा काळाठिक्कर पडला.

" भलतेच प्रश्न नको, चाकरमानी ! " फौजदार म्हणाला, " ठाकूर, या भ्रष्टाकाराला तुम्ही जबाबदार आहांत. तुमच्या डोक्यांत तें गांधीचं खूळ शिरलं आहे — महारांची शिवाशिव धरायची नाहीं. पण असले चाळे या गांवांत चालायचे नाहींत. महाराची जागा त्या पायरीवर. त्यानं तिथंच राहिलं पाहिजे; न् तुम्ही तर भलतंच शिक्षण पोरांना देत आहांत ! "

" फौजदार, मीं का सांगितलं देवाला शीव म्हणून काळूला ? " महादेवांनीं शांतपणें विचारलें. साऱ्या प्रकारानें ते गोंधळून गेले होते. निराशेनें त्यांचा चेहरा काळवंडून गेला होता.

" तुमची शिस्त असती, तर काळ्या देवळांत कां जाता ? पोरं शिवाशिव कां करतीं ? पण तुम्हाला महाराचांभारांनाही घरांत घ्यायचं आहे ना ! पण इथं हें नाहीं चालायचं. आमच्या वाडवडिलांनीं जें केलं नाहीं तें आम्हांला करायचं नाहीं ! "

फौजदार थांबला; महादेव काय उत्तर देतात त्याची वाट पाहूं लागला. पण महादेव स्तब्ध होते. हा अनुभव त्यांना अगदीं नवा होता. त्या नव्या अनुभवानें त्यांची उमेद खचून गेली होती.

" तुम्ही आल्यापासून गांवची शिस्त पार बिघडून गेली आहे. चरखा काय न् खादी काय ! अशानं का कांहीं होणार आहे ? उगाच सरकारची मर्जी मात्र खप्पा व्हायची ! "

" हें पहा फौजदार, तुमचं हें व्याख्यान ऐकायची आमची इच्छा नाहीं. तुमचं काय म्हणणं आहे तें सांगा पाहूं झटपट ! " सुरबा.

" म्हणणं दुसरं काय असायचं ? देवळांत भ्रष्टाकार झालाय्. देवाची शुद्धि

झाली पाहिजे. काळयाला न् अज्यांला शाळेंतून काढून टाकायचं, न् दंड म्हणून देवाला कांहीं तरी दिलं पाहिजे ठाकुरांनीं !"

"काळूला न् अर्जुनाला कां काढायचं ? त्यांना शाळेंतून काढायची जरूरी नाहीं. देवाच्या शुद्धीला जो खर्च येईल तो मी देईन. पण काळूला —" महादेव म्हणाले.

"काळूलाच काय, साऱ्या महारांच्या पोरांना शाळेंतून काढा अगोदर !" दाजिबा म्हणाला, "म्हारांना शिकून काय करायचं ? महार शिकले तर आमचीं गुरं कोण राखणार ? शेतीभातीला गडी माणसं कुठून मिळणार ? न् उद्यां हे शिकले तर देवळांत ढोल सुद्धां वाजवायचे नाहींत !"

"दाजिबा, महारांना शिकावंसं नाहीं वाटत ? हा काळू ब्राह्मणाच्या मुलां-पेक्षांही हुशार आहे. त्याची हुशारी गुरं राखण्यांत न् ढोल वाजविण्यांत कां फुकट घालवायची ?" महादेवांनीं विचारलें.

"मी म्हणतों तें हेंच. महारांचीं मुलं ब्राह्मणांच्या मुलांपेक्षां हुशार झालीं तर ब्राह्मणांना ढोल वाजवावा लागेल न् महार कथापुराणं सांगायला लागायचे ? आज कौतुक म्हणून करायला जाऊं तर उद्यां तें आमच्या बोकांडींच बसेल !"

"तसं झालं तर बिघडलं कुठें ? जो तो आपल्या अक्कलहुशारीनं समाजांत आपला दर्जा मिळवून राहील. महाराचा मुलगा विद्वान निघाला तर प्रोफेसर होईल, ब्राम्हणाचा मुलगा मंदबुद्धीचा निघाला तर तो—" महादेव जरा थांबले.

"तर काय तो ढोल गळ्यांत बांधून बडविल ?" फौजदारानें विचारलें, "ठाकूर, हें वीष आमच्या गांवांत नको. उद्यांच्या उद्यां याचा निकाल लागला पाहिजे. महारांना शाळेंतून बाहेर काढा तरच शाळा देवळांत चालू ठेवितां येईल. न् हे चरखे शिमग्यांत होळीसाठीं ठेवा—"

फौजदार तंबी देऊन निघून गेला, त्याच्या पाठोपाठ दाजिबाही पण निघून गेला.

---

# विधवा मुलीचा बाप ९

दुसरे दिवशीं शाळेंत चिटपांखरूंही हजर नव्हतें. सुरबा आणि महादेव ठाकूर मुलांची वाट पहात होते.

" सुरबा, मुलं येत नाहींत असं दिसतं !"

" मीं नाहीं तुला सांगितलं महादेव, मुलं आज येणं शक्य नाहीं. फौजदार न् दाजिबा यांनीं गांवकऱ्याचे कान फुंकले आहेत. कुणीही मुलांना पाठवायचा नाहीं. अरे, या मेंढरांना शिक्षणाचं काय होय ! हे असेच मरायचे. रानांतले पोपट शिकतील, पण हे शिकायचे नाहींत. उगाच कशाला जीव घालतोस खर्ची यांच्यासाठीं. खुशाल आपला चैनींत न् आरामांत राहा. इथं अगदींच करमत नसलं तर माझ्याबरोबर नदीवर येत जा मासे मारायला, किंवा रानांत जाऊं कवडे मारायला—"

" अरे पण, मी· आरामांत राहायला का इथं आलों आहें ? आपल्या गांवाची सेवा करायची, गांवांतल्या लोकांना शिक्षण द्यायचं, त्यांना सज्ञान करून सोडायचं. त्यांना अज्ञानांतून बाहेर काढायचं अशा हेतूनं मी इथं आलों आहें. आजवर मिळवलेली सारी संपत्तीही मातृभूमीच्या उद्धारासाठीं खर्च करायची माझी तयारी आहे; पण—"

" आला ना अनुभव तुला ? मी आरंभालाच तुला सांगत नव्हतों ? अरे

हे असेच मरायचे. मी इथें आलों तेव्हां असंच तुझ्यासारखं वाटत होतं मला. पण धोरणानं सारं ओळखलं मीं. तेव्हांपासून असा फटकून वागत असतों गांवाशीं. म्हणूनच भिऊन वागत असतात मला. तूं काय खरोखरच शंभुमहादेवाचा अवतार. चांगला आब राखून राहिला असतास तर, कुत्र्यासारखे तुझ्या मागून नाचत राहिले असते. अन् पहाशील, पुनः कसे येतील तुझ्या मागें ते. बाबा, द्रव्य आहे हें. सारं द्रव्याला लागलंय्. तुझ्यापाशीं चार पैसे आहेत हें जोंपर्यंत त्यांना ठाऊक आहे तोंपर्यंत ते तुझ्या अंगणांभंवतीं फिरत राहातील. हें महाराचं प्रकरण झालं नसतं तर तुला डोक्यावर घेऊन नाचले असते. पण थांब, अजूनही येतील; पहाशील. थोडी स्थिरस्थावरता झाली कीं पुनः येतील. मात्र त्या दोन सापांना खूष ठेवलं पाहिजे. मोठीं डांबिस माणसं आहेत. दाजिबानं या गांवांत काय करायचं बाकी ठेवलं आहे ? तरण्याताठ्या पोरींना—महारणींनासुद्धां त्याच्या नजरेंत एकटंदुकटं येण्याची सोय नाहीं. सारा गांव घशांत घातलाय् गहाण कर्जाच्या सापळ्यानं. तुझा द्वेषच करील तो. तूं त्याच्या मार्गांत आड येतोस ना ? भिकूची जमीन सोडवलीस. अर्जुनाची कड घेऊन भांडलास. त्या सर्पाला दुखवलं आहेस तूं. तो सूड घेण्याची—डंख मारण्याची संधि सोडणार नाहीं. त्याच्यावर मंत्र एकच—गांवाचा उद्धार करायचं वेड सोडून द्यायचं."

"तें कसं जुळणार ? काय वाटेल तें होवो, पण शेवटपर्यंत झगडत राहायचं. अगदीं शांतपणें सगळं सहन करून झगडायचं असा माझा निश्चय आहे. माझी खात्री आहे, मला शेवटीं यशच येईल !"

"मग तुला या मूर्खांशीं झगडतच राहावं लागेल जन्मभर !"

"कांहीं हरकत नाहीं. जें व्रत मीं घेतलं आहे त्यांत कितीही संकटं येवोत—"

"महादेवा, हें व्रत महाकठीण आहे. तुला मी हतबल करीत नाहीं. जिथं जिथं माझा उपयोग होईल तेव्हां मला हांक मार. मीही तुझा साथी होईन. तुझं व्रत थोर आहे. त्यांत माझा हातभार लागला तर मला मोठी धन्यता वाटेल !"

दोघेही बराच वेळ बोलत राहिले होते. महादेवांनीं ओळखलें कीं, आपली शाळा बुद्धिपुरस्सर बंद पाडण्यांत आली आहे. ते बसले असतां कुणी कुणी

लांबून टेहळणी करून जात होते. एकदोन मुलेंही येऊन गेलीं. महादेवांनीं त्यांना बोलावून विचारलें, " कायरे, शाळेंत नाहीं का यायचं ? "

" शाळेंत जायचं नाहीं असं बाबानं सांगितलं आहे ! " एक मुलगा म्हणाला.

" अन् मुलांना शाळेंत पाठवायचं नाहीं म्हणून फौजदार, दाजिबांनीं सगळ्यांना सांगून ठेवलं आहे. म्हणे सरकार पकडून नेईल शाळेंत गेलं तर. ठाकूर मास्तर खादीवाले आहेत. न् सरकारला खादी आवडत नाहीं. शिवाय मास्तर भ्रष्टाकार माजवितात महारांना घेऊन, असं दाजिबा सांगतात. दुसरी शाळा काढणार आहेत ते ! " दुसरा मुलगा म्हणाला.

सुरबांनीं हंसून महादेवांकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहिलें.

* * *

संध्याकाळीं महादेव सुरबा चाकरमान्यांबरोबर कवड्याची शिकार करायला गेले. महादेवांना शिकारीची हौस नव्हती, पण मनाला तेवढाच विरंगुळा म्हणून ते सुरबांबरोबर बाहेर पडले. शाळा बंद पडण्याचा त्यांच्या मनावर विलक्षण आघात झाला होता. त्यांना खचल्यागत वाटत होतें. केवढे मनोरे त्यांनीं मनाशीं बांधले होते ! पण ते क्षणांत धुळीला मिळाले होते. भरघोंस भाताचीं कणसें डोकें वर करून डौलानें डोलत असावीं आणि श्रावण महिन्यांतील पावसाची झोड झड पडून तीं भूमीला मिळावींत,—तसें त्यांना वाटत होतें.

अंतःकरणांतील व्यथेचें दुःख कमी करण्यासाठीं म्हणूनच ते सुरबांबरोबर बाहेर पडले होते.

रानांत फारसें दाट जंगल नव्हतें. सुरबांना फारशी शिकारही आढळली नाहीं, मग मिळणार कुठली ? पण त्याबद्दलचा विषाद कुणाच्याच मनाला वाटत नव्हता.

" तुझ्यासारखा अहिंसावादी सोबती मिळाल्यामुळं आज कांहीं शिकार जुळत नाहींसं दिसतं ! " सुरबा हंसून म्हणाले.

महादेवही हंसले; पण त्या हास्यांत जिवंतपणा नव्हता.

" आज शिकार नको. चल, आपण गांवांत असेच चक्कर मारून येऊं. तुलाही फिरायचंच आहे, तें आजच फिरूं." चाकरमानी म्हणाले.

महादेवांनाही ती कल्पना चांगली वाटली. त्यांनाही बरेच दिवस गांवांत चौंहीकडे हिंडून गांवच्या परिस्थितीची पहाणी करायची होती.

ते मुकाट्यानें चाकरमान्यांच्या मागून चालूं लागले. चाकरमानी त्यांना गांवांतील नव्या नव्या घडामोडींची माहिती करून देत होते आणि महादेव 'हुं'कार देऊन ऐकत होते; मधून मधून प्रश्नही करीत होते.

गांव कांहीं फारसा मोठा नव्हता. गांवाचा अर्धा भाग उंचवठ्यावर असून अर्धा भाग सखल होता. सखल भागांतच गांवची बहुतेक सारी वस्ती होती. याच भागांत शेती होती. याच भागाला लागून तीन दिशांनीं नदीचा प्रवाह वहात होता. पश्चिमेकडे उंचवठ्याच्या भागाच्या बाजूला जो प्रवाह होता तेथूनच शहरांत जाण्याचा मार्ग होता. पूर्वेच्या आणि उत्तरेच्या बाजूला सारा सखल भाग होता, आणि त्यांतच गांव वसलें होतें. दक्षिणेच्या बाजूला जो उंच भाग होता त्याच्या उतरणीवर जंगल होतें.

पूर्वेला उंचवठ्याच्या भागांत उघड्या माळावर जेथें जेथें आंबराई मधून मधून दिसून येई तेथें तेथें दोनचार घरांची वस्ती हटकून असायची. याच भागांत महादेव ठाकुरांचें घर होतें. त्यांच्या घराच्या पलिकडे जंगलाच्या बाजूला भटवाडी होती. तेथें पांचदहा ब्राह्मणांचीं घरें होतीं. तेथून थोडें अंतरावर गेलें कीं सुरबा चाकरमान्याचें घर. याच उंचवठ्यावर उत्तरेच्या बाजूला दाजीबा कुळकर्ण्यांच्या जागेंत दगड काढायच्या खाणी होत्या. सुरबांच्या घराच्या नजीक महादेव ठाकुरांची जमीन होती. तिच्यांत अलिकडे भगवान सुतारानें नवी खाण पाडली होती. इतर सुतारही नव्या खाणी पाडीत होते.

महादेव तेथें आले, तेव्हां भगवान खाणींतून नुकताच बाहेर पडत होता. त्याच्या डोकीवर दगडांचा भारा होता. अंगांतून घामाच्या धारा वाहात होत्या.

" काय भगवान, खाणींत कसा काय दगड लागलाय् ?" सुरबांनीं विचारलें.

" दगड तर अगदीं नव्या जातीचा आहे. किंचित् काळसर आहे, पण बराच चिंवट आहे. त्यामुळें भांडीं टिकायला चांगलीं येतील !"

इतर सुतार मंडळीही थोड्या वेळानें तेथें जमा झाली. महादेवांनीं त्यांची चौकशी केली. विडी, तमाखू, पान झालें.

" नव्या खाणीमुळें दाजिबाच्या खाणी ओस पडल्या न् दाजिबा सापासारखा फणफणतो आहे..." एक सुतार म्हणाला.

" आमच्यावर सूड उगवणार आहे असं ऐकतों ! " दुसरा म्हणाला.

" जमिनी काढून घेईल. त्याचं शेत नांगरतों ना आम्ही—सूड उगवण्याचं एवढंच एक साधन आहे ! "

" तसं नाहीं करायचा तो. जमिनी काढून घेऊन करतो काय, चाटणार आहे का नुसत्या जमिनी ? तो खंडाचा तगादा लावील. जती आणण्यापर्यंत पाळी आणील ! नुसत्या धमक्या देत राहील–सतावीत राहील ! "

" मग आम्ही आहों न् तो आहे ! जमिनी काय त्याच्या बापकमाईच्या आहेत ? जमिनीचे मालक आम्ही. कर्जापायीं त्याच्या घरांत गेल्या–अगदीं फुका पासरी गेल्या. म्हणून कांहीं अशा तशा हातच्या सोडायला बसलों नाहीं ! " एक तरुण सुतार संतापानें लाल होऊन म्हणाला.

महादेवांना ही नवीनच माहिती मिळत होती. सुरबा म्हणाले, " ऐकलंस महादेव ! असा आहे हा गांव. हे सुतार बारमहा खपतात, पण त्यांचं दारिद्र्य त्यांना सोडून जात नाहीं. आम्ही मात्र खुशाल चैन करतों आहोंत स्वस्थ बसून. वेळ घालविण्यासाठीं मासे मारीत बसतों मी–एवढंच ! "

सुरबांना बोलतांना क्लेश होत होते. त्यांना आपल्या वर्तनाची लाज वाटत होती.

महादेवांचें अंतःकरण त्या कष्टमूर्तींना पाहून भरून येत होतें. पोटासाठीं–वीतभर पोटासाठीं इतके श्रम करावे लागतात याची कल्पना त्यांना इतक्या मनोमय कधीं पटली नव्हती–प्रत्यक्ष अनुभूति आली नव्हती. समोर आठदहा तरुण जवान उभे होते. त्यांचीं अंगें धुळीनें भरून गेलीं होतीं. ज्यांचे देह तारुण्याच्या नवतीनें केळीच्या कोंबासारखे उफाळून डोळयांना सुखकारक व्हायचे तेच देह मातीनें मलीन राकट झाले होते. त्यांचा रसरशितपणा राखेनें

व्यापलेल्या निखाऱ्यासारखा लुप्त झाला होता. त्यांच्या शरीरावरून घामाच्या धारा वाहात होत्या. महादेवांना वाटलें—त्या घामाच्या रूपानें त्यांच्या अंगचा सारा जीवनरसच जणुं वाहून फुकट जात आहे.

त्यांच्या डोळ्यांच्या कडा ओलसर झाल्या. या अभागी लोकांच्या जीवनांत आपण चैतन्य निर्माण करायला आलों आहें—पण तें काम किती दुर्धर आहे, असें त्यांना वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

आणि ते सारे जेव्हां आपापले दगड डोकीवर घेऊन जाऊं लागले तेव्हां त्यांच्या पाठमोऱ्या आकृतींकडे महादेव ठाकूर किती तरी वेळ अनिमिष नेत्रांनीं पहात राहिले.

ते उतरणीची वाट चालूं लागले. सखल भागांतील दाट झाडींमधून त्यांची वाट होती. झाडांच्या दाटीमुळें सूर्याचीं उन्हें कवडशांच्या रूपानें आंत आलीं होतीं. हजारों छोटे छोटे पांढुरके ठिपके भूमीवर पडलेले पाहून तळ्यांतील शुभ्र कमळांची महादेवांना आठवण झाली.

तेथून जरा पुढें गेल्यावर महारवाडा लागला. अर्जुनाच्या घराजवळ ते आले तेव्हां सुरबांनीं हांक मारली, " अर्जुन, ए अर्जुन ! घरांत आहेस का ? "

पण त्यांच्या प्रश्नाला उत्तर मिळालें नाहीं. नाहीं म्हणायला एक कोंबडी आपल्या दहाबारा पिलांसह विशिष्ट प्रकारचे आवाज करीत तेथें आली. बाजूच्या घरांतील कुत्रें भुंकूं लागलें.

आणि आजूबाजूला आपापल्या अंगणांत सुपें रवळ्या विणीत बसलेल्या महार स्त्रीपुरुषांनीं त्यांच्याकडे एकाच वेळीं पाहिलें.

सुरबांनीं पुनः थांबून थांबून हांक मारली—" अर्ज्या, काळ्या, जायल्या ? "
तरीही उत्तर मिळालें नाहीं.

" कुठें मसणांत गेलीं हीं ! " असें म्हणून सुरबा जरा पुढें झाले.

इतक्यांत दार उघडून जाई बाहेर येत असलेली त्यांच्या दृष्टीला पडली.

तिचा चेहरा सुजल्यागत दिसत होता. डोळे लाल झाले होते. केंस विस्कटलेले होते.

" काय ग, अर्जुन कुठें गेला ? "

जाईचे डोळे भरून आले. कांठोकाठ भरलेल्या घागरींतील पाण्याप्रमाणें वाहूं लागले.

" काय झालं ग ? "

" अर्जुन कुठें गेला ! " कष्टानें जाई उत्तरली.

" कुठं गेला ? "

" बहुधा मुंबईला ! आदले दिवशीं मुंबईला जायच्या गोष्टी करीत होता. "

" सांगून नाहीं का गेला ? "

" नाहीं. सांगून जातां आलं नसतं त्याला. म्हणूनच न सांगतां गेला ! "

" चांगलं झालं. या उकिरड्यांत पडून राहून काय करणार होता. चांगलं झालं, कांहीं रडूं नकोस. जा ! डोळे पूस. मुंबईला गेला ना ? माणूस म्हणून तरी जिवंत राहील. इथं काय जनावराचं जिणं ! काय महादेव ? "

" छळानं वैतागून गेला असला पाहिजे तो ! " ठाकूर म्हणाले, " मला सांगून गेला असता तर ? राहून घेतला असता. मला फार उपयोग होता त्याचा. न् मुंबईलाच जायचं होतं तर कुणाला तरी पत्र दिलं असतं. डॉक्टर आंबेडकरांकडेसुद्धां पाठविला असता—"

" हेंच म्हणत होता. डॉ. आंबेडकर यांच्या संबंधानें कांहीं तरी बोलत होता खरं ! " जाई म्हणाली.

महादेवांना मोठी चुटपूट लागून राहिली. त्यांनीं विचारलें, " काळू कुठं आहे ? "

" काळू ? काळू पैलाडी बामणाच्या घरीं राहायला गेला."

" बामणाच्या घरीं ? तिथं काय गुरं राखणार आहे ? " सुरबानीं विचारलें.

" दुसरं काय ! " जाईनें एक निश्वास सोडला.

* * *

भरलेल्या अंतःकरणानें महादेव सुरबांच्या घरीं आले. सुरबांचें घर खेड्याच्या मानानें छान होतें. पेन्शन घेऊन आल्यावर त्यानीं नवें घर बांधलें होतें.

घरांत शिरतां शिरतां सुरबानीं हांक मारली, " भागी, ए भागी ? "

एक वीसबावीस वर्षांची विधवा मुलगी दारावर येऊन उभी राहिली.

तिनें विचारिलें, " काय बाबा ? "

" हे, ठाकूरकाका तुझे !" सुरबा म्हणाले.

महादेवांकडे पाहून भागीनें हास्य केलें. महादेवांना वाटलें किती प्रसन्न आहे हिचें हास्य ! चन्द्राचें खळें पाहून जसें कांहीं मधुर मधुर वाटतें तसें तिचें हास्य पाहून महादेवांना वाटलें.

आणि त्याबरोबर हेंही त्यांना वाटलें – या मुलीला आपण कुठें तरी पाहिलें आहे. त्यांनीं आपल्या मेंदूला खूप ताण दिला. तेव्हां त्यांना आठवलें – खाणींत भगवानाच्या बाहुपाशांत सुखानें पहुडलेली तरुण स्त्री ती हीच – भगवानाच्या घरीं तिन्हीसांजा अंधुक प्रकाशांत अस्पष्ट दिसलेली स्त्रीमूर्ति ती हीच.

त्यांना ती कल्पना असहनीय वाटली. आपल्या परम मित्राची कन्याच त्या दृश्यांतील रमणी असावी ही कल्पना त्यांना आवडली नाहीं. त्यांना किंचित् उद्वेग वाटला. पण हा उद्वेग क्षणभरच टिकला.

कारण अतिशय गोड आणि निरागस हास्य करीत ती म्हणाली, " काकांना इतक्या दिवसांतून आजच फुरसद होतेय् आमच्या घरीं यायला ! " तिच्या या शब्दांतील मार्दव, माधुर्य आणि अनुकंपा महादेवांना लोभनीय वाटलीं. त्यांचा तिच्यावरचा रोष कुठल्या कुठें नाहींसा झाला.

त्यांनीं हंसून म्हटलें, " तूं तरी आलीस का कधीं काकाला भेटायला ? कां नाहीं आलीस ? "

त्यावर भागीनें जें हास्य केलें त्यानें महादेवांना साऱ्या दिवसांचा शिण कुठल्या कुठें नाहींसा झाल्यासारखें वाटलें.

भागी चहा करायला गेली तेव्हां महादेव सुरबांना म्हणाले, " सुरबा, तुझ्या जातींत पुनर्विवाह करतात, मग तूं भागीला या संन्यासदीक्षेंत कां कोंडून ठेवली आहेस ? "

सुरबांनीं एक भला मोठा उसासा सोडला !

"काय सांगूं महादेव, काळीज जळतं आंतल्या आंत आठवण झाली कीं ! एकुलत्या एक मुलीच्या नशिबीं असलं दुःख आल्यामुळें उमेद खचून गेली आहे माझी. कौतुकानं अगदीं लहान असतांना लग्न केलं, पण झालं भलतंच. कमळं काढायला तळ्यांत गेला न् तिथून परत कांहीं आला नाहीं हिचा नवरा. दहा वर्सांची असेल नसेल भागी तेव्हां. कांहींसुद्धां कळत नव्हतं. नि अजून तरी काय तिला कळतंय ? तूं म्हणतो तें खरं. खूप विचार येतात तसे मनांत. पण धीर होत नाहीं मनाला. पाटाची चाल आतां आमच्याही जातींतून जात चालली आहे. आम्हीही आतां पांढरपेशांच्या संगतीनं त्यांच्यासारखे वागूं लागलों आहों. आतां फार क्वचित्च पाट लागतात, अन् कुणी लावले तर त्यांच्यावर जातीची करडी नजर असते. त्यांना त्रास झाला नाहीं तरी त्यांच्या संततीला कुळवंतांच्या घरांत मान नाहीं. कुणीही घरंदाज मराठा पाटाच्या लग्नापासून झालेल्यांशीं सोयरिक करायला तयार नसतो. या बाबतींत आम्ही आतां तुम्हां बामणांहून कांहीं निराळे नाहीं. भागीचा मीं जर पाट लावून दिला तर मला या गांवांत मान ताठ करून चालतां येणार नाहीं—"

सुरबा चाकरमानी हळुहळू बोलत होते. आपलें बोलणें भागीच्या कानावर जाऊं नये याबद्दल ते खबरदारी घेत होते.

पण भागी दरवाजाआड राहून ऐकत सारें होती हें त्यांना काय ठाऊक ? महादेवांना मात्र तिची चाहूल लागली होती.

" तसं पाहिलं तर त्याची कांहीं जरूरी नाहीं आतां. मला ती मुलासारखीच आहे. ती घरीं परत आली तेव्हां मीं मनांत म्हटलं, भागी आतां मुलगाच आहे माझा. मुलाप्रमाणं वागवीन तिला मी ! "

महादेव नुसते हंसले. मुलीला मुलाप्रमाणें वागवीन म्हणणें ही गोष्ट कांहीं वाईट नाहीं. विधवा मुलीचा प्रत्येक बाप असेंच म्हणत असतो. पण ती मुलगी मुलगा कांहीं होऊं शकत नसते. आणि जोंपर्यंत ती मुलगी असते तोंपर्यंत तिच्या देहांतील स्त्रीत्व नष्ट झालेलें नसतें.

महादेवांना याचेंच हंसू आलें होतें. आणि त्या हंसण्याच्या मागें भागीच्या प्रणयाचा अनुभव होता.

" कारभारीण त्याच दुःखानें वारली. तेव्हांपासून हीच माझ्या जिवाचा विरंगुळा. हिचं असं झालं तेव्हां जिवाचा वैताग आला, नोकरीचा राजीनामा दिला. पण कमानी साहेबांची माझ्यावर मेहेरबानी होती. त्यांनीं माझ्यावरचा प्रसंग जाणून मला पेन्शन देवविलं न् नोकरीला रामराम ठोकून आलों. कमानीसाहेबांचीही एक गोड पोरगी होती. पोरीनं त्यांना दगा दिला होता— पण तो तिच्या मायेनं झुरत होता मनांत. त्या मायेनंच त्यांना माझ्या मनाचं दुःख जाणवलं न् त्यांनीं मला आज सुखानं चार घांस खाण्याचं भाग्य लाभूं दिलं आहे—"

सुरबा आतां बोलत होते खरे, पण महादेवांना सांगण्याची उत्कटता त्यांत नव्हती. जुन्या आठवणींच्या स्मरणानें त्यांना जरा विरंगुळा वाटत होता म्हणून ते बोलत होते.

भागी चहाचे पेले घेऊन आली, तेव्हां त्यांना आपलें बोलणें अर्थात् थांबवावें लागलें.

महादेव घरीं परतून येत असतां त्यांच्या डोक्यांत भागीचेच विचार घोळत होते. भागीची करुणरम्य मूर्ति त्यांना दिसत होती. त्यांचें अंतःकरण भागीबद्दल वात्सल्यानें भरून येत होतें. ते मनांत म्हणत होते—ही पोर एक दिवस सुरबाच्या अंतःकरणावर आघात करणार. त्याला विस्मयाचा धक्का देणार. आज भागी सुरबावर आईसारखी माया करते आहे, सुरबा तिच्या मायेच्या पांघरुणाखालीं सुखानें राहिला आहे. पण तिच्यांतील 'स्त्री' जेव्हां जागृत होईल तेव्हां ती बंड केल्यावांचून राहाणार नाहीं. मग ती तें मायेचें पांघरूण सुरबाच्या अंगावरून ओढून घ्यायलाही मागें पुढें पाहाणार नाहीं. स्त्री ही जितकी प्रेमळतेची देवी असते, तितकीच ती निष्ठुर राक्षसीही असते.

---

## प्रीतिलतेला बहर १०

ज्येष्ठ महिना सुरू होऊन एक आठवडा झाला होता. आकाशांत कृष्ण-मेघांची दाटी झाली होती; दक्षिणेकडे मेघांच्या राशी पसरल्या होत्या. एकामागून एक मेघ धांवत होते. त्या कृष्ण आकृतींच्या विविध हालचाली पाहून आकाशांत जणुं राक्षसांचा खेळ चालला आहे असें वाटावें. त्यांतून मधून मधून मेघगर्जना होई, तीमुळें राक्षस आनंदानें बेहोष होऊन ओरडत आहेत अशी कल्पना मनांत आली असती. त्या कृष्णमेघांवर ढगांआड लपलेल्या किंवा मावळतीच्या सूर्याचीं किरणें पडलीं कीं मेघांच्या कडा रुपेरी होत. त्यामुळें जी शोभा येई ती अवर्णनीय होती. आणि मधूनच पूर्वेच्या बाजूला विविध रंगांचें इंद्रधनुष्य चितारलें जाई त्या वेळची शोभा तर फारच आल्हादायक.

महादेवांना किती तरी वर्षांनीं हें सृष्टीचें वैभव पहायला मिळत होतें.

दक्षिणेकडून वाऱ्याचे झोत उठूं लागले. चोहींकडे गडद अंधकार पसरला आणि पाऊस पडायला सुरवात झाली. गांवांतील शेतकरी आनंदीत झाले.

पाऊस सारखा पडूं लागला. चोहींकडे हिरवेंहिरवें गार होऊन गेलें. साऱ्या गांवकऱ्यांनीं आपले उन्हाळी उद्योग बंद केले आणि शेतीच्या कामाला सुरवात केली होती. शेतांत नांगर फिरूं लागले. सुतारांनीं खाणींना रजा देऊन नांगर हातीं धरला.

पण चारसहा दिवस झाले तरी पाऊस कांहीं थांबेना. पाणीच पाणी होऊन गेलें सगळीकडे. तेव्हां शेतकरी नांगर आटपून पाऊस ओसरण्याची वाट पाहूं लागले. नदीचें पाणी वाढूं लागलें. दोन्हीं तीरांपलीकडून गांवांतही पाणी शिरूं लागलें.

महादेव हें सारें मोठ्या उत्सुकतेनें पाहात फिरत होते. उत्तर आणि पूर्व दिशेच्या बाजूनें नदीचें पात्र तुडुंब भरून गांवांत पाणी शिरूं लागलें. नांगरलेलीं शेतें पाण्यानें भरून गेलीं. महादेवांना वाटलें, हा पूर आतां कोठवर वाढणार कोण जाणे.

पण पूर येणें ही नित्याचीच गोष्ट होती. दर वर्षी गांवांत पूर येई; शेतांत पाणी शिरे. आजूबाजूंचीं शेतांवरील घरेंही कधीं कधीं कोसळत. घरांत पाणी शिरून थोडेंबहुत नुकसानही होई. असें नुकसान होणें हा गांवच्या लोकांचा रोजचाच अनुभव होता. आणि या वर्षातही असेंच झालें असल्यामुळें त्याचें कुणाला फारसें कांहीं वाटलें नाहीं. ज्यांच्या घरांच्या आवारांत पाणी शिरलें त्यांनीं विशेष सावधगिरीनें आपलें सामान आवरलें. शक्य होतें त्यांनीं गुरांच्या गोठ्यांत आपलें बिऱ्हाड नेलें.

एका दिवसांत पूर ओसरून जाईल आणि सारें स्थिरस्थावर होईल असें सर्वांना वाटलें.

पण तसें कांहीं घडून आलें नाहीं. पाऊस अविरत पडत राहिला. नदीला चारी बाजूंच्या गांवांतील ओढे येऊन मिळत होते आणि पाणी सारखें वाढत होतें.

महादेवांचें घर उंचवट्यावर असल्यामुळें त्यांना पुराचें भय नव्हतें. पण भय त्यांच्या अंतःकरणांत निर्माण झालें होतें एवढें मात्र खास. आपल्या घराच्या समोरील आंब्याच्या झाडाखालीं बांधलेल्या चौथऱ्यावर उभे राहून ते पाहात होते—

गांवाची सखलाट जणुं पाण्यानें बुडून जणार आहे थोड्या वेळानें असेंच त्यांना वाटलें. घराच्या आजूबाजूला पुराचें पाणी अजून येऊन पोंचलें नसलें तरी पावसाच्याच पाण्याचा एवढा मोठा संचय तेथें झाला होता कीं, त्यांना

वाटलें नदीच्या पाण्याचा आणि या पाण्याचा संगम होण्यास कितीसा वेळ लागणार! त्यांना भीति वाटली. सुतारवाडा, गांवकरवाडा पाण्यानें बुडून जाणार असेंच त्यांना वाटलें.

त्यांनीं लगेच सुरबांना बोलावून घेतलें.

" सुरबा, हा पूर आतां कोठवर वाढणार कळत नाहीं. काय करावं? हीं माणसं फुकट बुडून नाहीं का जाणार?"

" जाईनात का! कांहीं तजवीज कां नाहीं केली? पशुपक्षांनाही आपल्या भावी संरक्षणाची तजवीज करावीशी वाटते. मग हीं तर बोलून चालून माणसं. कां नाहीं करूं त्यांनीं अगाऊ कांहीं व्यवस्था? पूर काय आज नवीनच आहे?"

" खरं आहे. पण त्यांना बोल लावायची ही वेळ नव्हे. आधीं त्यांचे जीव वांचविले पाहिजेत. हें कांहीं शहर नाहीं. शहरांत पांच मिनिटांत शेंकडों साधनं जमा करतां येतात. तेव्हां इथं काय करायचं तेवढंच सांग. आधीं जीव वांचवायचे. मागाहून त्यांची काय हजेरी घ्यावयाची असेल ती घेऊं!"

" उपाय काय सुचवायचा? घरांत पूर शिरण्यापूर्वी आधीं साऱ्या मडक्या हंडे घेऊन निवाऱ्याच्या ठिकाणीं जायचं. पण कुठं जायचं? हाच प्रश्न आहे मुळीं. रानांत का जाऊन बसायचं?"

" इथं माझ्या घरीं खूप जागा आहे. घर नाहीं पुरलं तर मांगरांतही जागा होईल. येतोस का जरा माझ्याबरोबर? जाऊं आपण त्यांना आणायला."

" येतों म्हणून काय विचारतोस? तुझ्या प्रत्येक कामांत मी आहेच म्हणून समज. जिथं तुझी पत्रावळ तिथं माझा द्रोण ठरलेला. चल नीघ पाहूं कुठं जायचं तें!"

छत्र्या घेऊन दोघेही बाहेर पडले. पाऊस साधारण ओसरला होता. रस्त्यांत सगळीकडे चिरचिरीत झालें होतें. लहान लहान पांदणींमधून पाणी वहात होतें. जेथें उंचावरून पाणी पडत होतें तेथें छोटे धबधबे झाले होते. झाडांवर भिजलेले पक्षी पंख हालवून पाणी झाडीत होते. सारी धूळ धुरळा पाण्यानें वाहून जाऊन झाडांझुडपांवर टवटवी आली होती.

प्रत्येकाच्या खळ्यांत उभे राहून महादेव आणि सुरबा सांगत होते, " पावसाचा कांहीं नेम दिसत नाहीं. अजूनही सारखी गर्जना होतेय्; आणखीही पाऊस पडायचा न् मोठा पूर यायचा. शक्य तेवढ्या लवकर बायकापोरांना घेऊन आमच्या घरीं चला."

सुतारवाड्यांतील मंडळी विचारांत पडली. आजवर त्यांना असें सांगणारा कुणीच भेटला नव्हता. आणि घर सोडून जायची जरूरीही वाटली नव्हती कधीं. आणि आजहि त्याची जरूरी निर्माण झाली आहे असें त्यांना वाटेना.

" पूर काय येईल न् जाईल ! त्याला एवढं काय घाबरायचं. न् तो आजच का येतोय् ! दर वर्षाचं हें असं आहे. त्यासाठीं घर सोडून जायची जरूरी नाहीं." कांही जणांनीं त्यांना उत्तर दिलें.

" अरे, पण या वर्षाचं चिन्ह निराळं दिसतं आहे !"

" घरांत पाणी आजवर कधींच शिरलेलं नाहीं. न् आतां यापुढेंही कधीं शिरणं शक्य नाहीं. आजवर देवानं तारलं तोच यापुढेंही तारील. त्याच्यावर भार टाकून राहिलं कीं सारं कांहीं निभावून जातें !"

सुतार मंडळींचें मन वळेना तेव्हां मोठ्या नाइलाजानें महादेव, सुरबा गांवकर वाड्यांत गेले. तेथें त्यांनीं आपल्या येण्याचा उद्देश सर्वांना समजावून सांगितला.

पुराला भिऊन घर सोडून जायचें ह्या कल्पनेनें ते सारे महादेवांना खदखदां हांसले.

आधींच शाळेच्या प्रकरणामुळें महादेवांविषयीं त्यांचीं मनें साफ नव्हतीं. त्यामुळें हें एक नवें खुळ महादेव ठाकुरानें काढलें आहे असें सर्वांनीं मनाशीं ठरविलें. या खुळाला शक्य तेवढा विरोध करायचा असा त्यांनीं मनाशीं निश्चय केला.

फौजदार म्हणाला, " पुराला घाबरून जायला आम्ही काय शहरचे लोक आहोंत ?"

" आमचे आजेपणजे वाडवडील कधीं घर सोडून गेले नाहींत, मग आम्हींच कां म्हणून जायचं ?"

## मऊ मऊ स्पर्श १२

दुसरे दिवशीं महादेव ठाकुरांच्या हातांत पोस्टमननें एक पत्र आणून दिलें. पत्रावरील विलायतचा छाप पाहून महादेवांनीं ओळखलें, कीं तें पत्र जगन्नाथाचें आहे. त्या पत्रांत जगन्नाथानें लिहिलें होतें—

" तुमचीं सारीं पत्रें मला मिळालीं. वनगांवाला गेल्याचें पत्रावरून समजलें. मी युरोपच्या प्रवासांत असल्यामुळें तुमचीं पत्रें मला वेळीं मिळूं शकलीं नाहींत. आपल्या जन्मभूमीची सेवा करण्यासाठीं तुम्ही गेलां हें ऐकून मला फार आनंद वाटला. पण तुम्ही ज्या मार्गानें जन्मभूमीची सेवा करणार आहांत तो मार्ग तुम्हाला कितपत यश देईल हें कांहीं मला नक्की सांगतां येत नाहीं.

तुमच्या पत्रांवरून तर दिसतेंय् कीं गांवच्या विरोधाशीं तुम्हाला झगडावें लागत आहे. खेडेगांवच्या अज्ञानी लोकांचा विरोध ही एक असामान्य शक्ति असते. तिच्याशीं झगडून तीवर मात करणें फार कठीण गोष्ट आहे. कोणतीही गोष्ट त्यांना समजून सांगून समजत नाहीं. नित्याहून जरा कांहीं निराळें असें त्यांना दिसून आलें, कीं त्याला त्यांचा विरोध झालाच म्हणून समजा. तुमच्या शाळेचीच गोष्ट घ्या ना; त्यांत विरोध करण्याएवढं काय होतं ? पण नाहीं. तुम्ही निराळेंच कांहीं करत होतां ना, मग घाला मोडता त्यांत.

स्वतःचें कल्याण अकल्याणही ज्यांना समजत नाहीं अशा लोकांपुढें तुम्हीं काय करणार ? मला भीति वाटते कीं तुमचे सारे प्रयत्न फुकट जातील. मला केव्हां केव्हां वाटतं तुमचं चुकत तर नाहीं ना ? अज्ञानाच्या प्रचंड पर्वताला खोऱ्या पावड्यांनीं खणून थोडंच खिंडार पडणार आहे. त्याला सुरुंगच लावला पाहिजे. तुमच्या गांधींच्या मार्गांनीं खेड्यांची सुधारणा होईलसं मला तरी वाटत नाहीं. त्यानें फारतर चारदोन लोक अक्षर ओळखणारे होतील, पांचदहा सूत काढतील.

खेड्यांची सुधारणा करायला प्रथम राजसत्ता आमच्या हातीं आली पाहिजे. एकदां सत्ता हातीं आली कीं तिच्या सहाय्यानें एका क्षणांत खेडीं सुधारतां येतील. ही राजसत्ता प्रथम हातीं आणण्याचे प्रयत्न झाले पाहिजेत. त्याची अगोदर जनतेला जाणीव करून दिली पाहिजे.

बाकी तुम्हाला मी असं लिहिणं गैरच, नाहीं का ? तुमचा हेतूच मुळीं सामाजिक सुधारणेचा. खेड्यांतील लोकांना अज्ञानांतून सज्ञानाप्रत नेणें, त्यांना स्वताचं कल्याण अकल्याण समजण्याइतकं ज्ञानी करणें हेंच तुमचं कार्य दिसतें. त्या दृष्टीनं त्यांना शिक्षण देणं हा मार्ग खरोखरच चांगला आहे. साक्षरता प्रसार जितका जास्त होईल तितके लोक आपल्या देशाचा जास्त विचार करूं लागतील. आज थोडीशी का होईना तुमच्या पाठीशीं सत्ता असती तर तुमचा मार्ग यशस्वी झाला असता. पण अशी सत्ता नाहीं म्हणूनच तुम्हांला शाळा चालवितां येत नाहीं. तुमचा प्रयोग यशस्वी झाला तर मला त्यांत आनंदच वाटेल. पण तो नच साधला तरीही तुम्हांला जो अनुभव येईल तो नवे प्रयोग करण्याकडे तुम्हांला खचित उपयोगी पडेल."

महादेवांनीं पत्र वाचून होतांच हास्य केलें. त्यांना वाटलें—जगन्नाथ अजून अननुभवी आहे. त्याच्या दृष्टीनें हें ठीक आहे. पण आजवर जगाची प्रगती काय अशी एकदम झाली आहे ? सुधारकांना, लोकसेवकांना विरोध होणें हें नेहमीचेंच आहे. जगाच्या आरंभापासून जनतेला नवी शिकवण देणारे तिच्याशीं

झगडत लढत तिला शिकवीत आले आहेत. त्यांचें धैर्य अपरंपार होतें, त्यांची चिकाटी मोठी होती, त्यांना लोककल्याणाची तीव्र जाणीव होती म्हणूनच त्यांना विरोधाला टक्कर देतांना कांहींच वाटलें नाहीं. आगरकरांना नवी समाज-नीति सांगतांना थोडा का विरोध झाला ? टिळकांना नवी राजनीति सांगतांना थोडा का त्रास सहन करावा लागला ? गांधींना सत्याग्रहाचें आणि अहिंसेचें तत्त्वज्ञान लोकांच्या गळीं उतरवितांना थोडा का विरोध होत आहे अजून ? पण त्यांनीं आपला निश्चय कांहीं सोडला नाहीं. म्हणूनच आगरकरांच्या सुधारणा आज जुन्यापुराण्या ठरून आजची पिढी आगरकरांच्या पुढें अर्धशतक तरी गेली. टिळकांचें त्या वेळचें जहाल राजकारण आजच्या मानानें मवाळ ठरत आहे. कुणी सांगावें, उद्यां गांधींच्या मार्गानें सारें जगही जाईल कदाचित.

जगन्नाथाच्या पत्रावर त्यांनीं खूप विचार केला. पण खेड्यांची सुधारणा करण्याचा दुसरा मार्ग त्यांना सुचला नाहीं. साक्षरतेचा गांवच्या लोकांनीं फन्ना उडविला होता त्यामुळें त्यांचें अंतःकरण तीळतीळ तुटत होतें. पण त्यांची उमेद दांडगी होती. पुनः शाळा सुरू करीन अशी त्यांनीं मनाशीं सात्विक प्रतिज्ञा केली होती.

दसऱ्याच्या दिवशीं सीमोल्लंघनाच्या वेळीं जो प्रकार झाला होता त्यांत ते स्वतः सांपडल्यामुळें त्यांचें अंग कसें मोडून आलें होतें. भगवानानें त्यांना सांवरलें, नाहींपेक्षां त्यांचा एखाद्या दगडावर कपाळमोक्षच व्हायचा.

मारामारींत आठदहा असामींना चांगलेंच लागलें होतें. खुद्द फौजदाराचा डावा पाय गर्दींत सांपडून दुखावला होता. त्यामुळें त्याच्या अंगाचा भडका उडाला होता. प्रकरण कोर्टदरबारीं न्यावें कीं नाहीं याची फौजदार मनाशीं शहानिशा करीत होता. पण स्वतांचाच पाय त्यांत अडकल्यामुळें त्यांतून पाय कसा काढून घ्यावा हें त्याला कळेना. त्यामुळें मारामारीनंतर गांवांत कोर्टाची भाषा कुणीच काढीना. मात्र दोन्ही पक्षांची चुरस वाढली होती. एका पक्षाला फौजदार आणि दाजिबा कुळकर्णी यांची सहानुभूति होती. दुसऱ्या पक्षांत गांवांतील सुतार आणि महार होते. त्यामुळें त्यांचा दुस्वास करण्याची बुद्धि दाजिबाला होत होती. दाजिबाकडे सुतारांच्या जमिनी गहाण होत्या. कुणी त्याच्या जमिनी खंडानें करीत होते. तेव्हां त्यांना छळण्याचें हत्यार आयतें

दाजिबाच्या हातीं होतें. सुतारांनीं दुसऱ्या पक्षाला सोडचिठी देऊन पहिल्या पक्षाशीं मिळतें घ्यावें असे दाजिबाचे प्रयत्न चालू झाले.

संध्याकाळच्या सुमारास महादेव सुतारवाड्यावर गेले तेव्हां ही हकीकत त्यांना कळली.

"येऊन जाऊन काय आमच्या जमिनीच काढून घेणार ना ? घेऊं दे !"

"जमिनी काय याच्या बापाच्या आहेत ?"

"खुशाल घेऊं दे ! पाहूं दुसरे कोण घेतात ते !"

"एकेकाचे मुडदे पाडूं शेतांत—"

असे संवाद चोंहोकडे चालू होते.

महादेवांनीं आश्वासन दिलें, "जमिनी गेल्या तरी हातघाईवर येऊं नका. शांतपणें सारें सहन करा. नाहीं जमिनी मिळाल्या तर माझ्या जमिनी नांगरा. खुशाल पिकवून खा — एक पैही मला देऊं नका —"

* * *

त्या दिवशीं पहांटे सुरबा चाकरमान्यांच्या खळ्यावर मळणी होती. भगवान् सुतार चाकरमान्यांना मदत करीत होता.

शुक्राचा तारा उगवला तेव्हां भगवानानें बैल सोडले. आणि मळणीला बांधून तो बैल हांकू लागला. मळणीच्या खांबाभोंवतीं आदले दिवशीं रात्रींच भाताच्या पेंढ्या पसरून ठेविल्या होत्या. कांहीं कुळवाडीही मदत करायला आले होते. बैल हांकून थोडा थकवा आल्यावर भगवान् बाजूच्या कलमाच्या झाडाखालीं चिलीम ओढीत बसला.

शुक्राच्या सौम्य चांदण्याचा शुभ्र प्रकाश चोंहोकडे पसरला होता. शुक्राची चांदणी कशी तेजानें न्हात होती. मोहळापासून जसा मध झाडाखालीं ठबकत असतो तसें चांदणें शुक्राच्या चांदणीपासून ठिबकत आहे असें वाटत होतें. त्या चांदण्यांत चन्द्रकिरणांची स्वच्छता नव्हती; धुक्याची अंधुकता होती. सभोंवारच्या झाडाझुडपांचे शेंडे रुपेरी कडांप्रमाणें दिसत होते. हवेंत किंचित् गारवा वाटत होता.

अशा वेळीं भागीला मळणीच्या खळ्यांत पाहून भगवानाच्या अंगावर सुखकारक रोमांच उभे राहिले. भागी नुकतीच उठून खळ्यावर आली होती. तीं नुकतीच झोंपून उठली असल्यामुळें तिच्या डोळ्यांवर धुंदी दिसत होती. केंस विस्कटलेले होते–भगवानाला वाटलें, ही शुक्राची चांदणीच जणुं आली आहे.

भागी मळणीचें गवत झाडीत होती. ती दोन्ही हातांनीं गवत घ्यायला वांकली म्हणजे तिच्या वक्षस्थळाला जी पुष्ठता येई तिच्याकडे भगवानाची दृष्टी खिळून राही. ती उभी राहून 'शू शू' असा आवाज करीत गवत झाडूं लागली, कीं तिच्या ज्या उत्तेजक हालचाली होत त्यानें भगवानाचा जीव वेडावून जाई. आणि दाणे झाडलेलें गवत ती पलिकडे टाकतांना आपल्या दोन्ही हातांची जी झेंप टाकी त्यानें तो अगदीं मुग्ध होई. मळणीवर आणखीही कांहीं बायका होत्या; पण त्या सर्वांच्या कंकणध्वनिमध्यें भागीचा आवाज कोणता हें तो आपल्या मनाशीं अचूक सांगूं शके.

त्याची वृत्ति अगदीं बेभान होऊन गेली.

आणि भागी जेव्हां खळ्याच्या कडेला आली तेव्हां त्यानें अगदीं हळू आवाजांत हांक मारली, " भागी ! "

ती हांक भागीनें ऐकिली. तिनें आजूबाजूला पाहिलें आणि गवताचा ढीग बाजूला टाकण्याचें निमित्य करून ती भगवान बसला होता तेथें गेली.

भगवानानें तिचा हात धरून आवेगानें तिला जवळ ओढली. दोन उष्णश्वास परस्परांत मिसळले. त्या मादक श्वासानें दोघांनाही अगदीं बधिरता आल्यागत झालें.

त्याच्या बाहुपाशांतून क्षणभरानें सुटका करून घेत भागीनें भगवानाला विचारलें, " भगवान्, मला आतां जीव तरी दिला पाहिजे, किंवा—"

भगवानानें घाबरून विचारलें, " काय झालं ? कुणाला समजलं कीं काय ? "

" नाहीं रे, दुसरंच कांहीं ! "

" दुसरं काय ? "

" काय सांगूं कपाळ माझं ! एवढंही समजूं नये तुला ! "

" असं होय ! मग काय करायचं म्हणतेस ? "

" हें तूं मला विचारतोस का ? तूंच सांग आतां मी काय करूं तें ! "

भगवान, क्षणभर विचार करीत राहिला. त्याचा जीव घाबरून गेला होता हें खचीत, पण अंतःकरणाच्या आंतल्या आंत कुठें तरी आनंदाच्या इवल्याशा ऊर्मि उठत आहेत असा त्याला भास झाला. त्या भासानें कीं ऊर्मींनीं त्याच्या अंगावर नाजूक रोमांच उभे राहिले. त्यानें अधीरतेनें विचारलें—

"भागी, पळून गेलों तर आपण ?"

"पळून ? अन् कुठं जायचं पळून ?"

"अगदीं दूर दूर—"

"पण कुठें ?"

"जिथें कुणीच आपणाला ओळखणार नाहींत. तिथें आपण नवराबायको म्हणून राहूं, अन्—"

"अन् काय ?"

"नि तिसरं एक माणूस आपल्यांत येईल मग लवकरच !"

भागीचें सर्वांग गरमगरम रक्तानें सळसळून निघालें. क्षणभर तिच्या अंतःकरणाला कसला तरी मऊ मऊ स्पर्श झाल्यागत तिला वाटलें.

पण तें क्षणभरच.

तिनें मग हळूच विचारलें, "मग कधीं जायचं पळून ?"

"सांगतों. एकदोन दिवसांत सांगतों तुला. जा आतां. कुणाला संशय यायचा !"

पलिकडच्या झाडावर घुबड ओरडलें. भगवानाला तो आवाज अशुभ वाटला. त्यानें खालीं वांकून एक दगड घेतला आणि त्या झाडावर फेंकला. घुबड उठून गेलें आणि पानांवर दगड बसल्याचा आवाज ऐकूं आला.

---

# निसर्गाला शरण १३

त्यानंतर चारसहा दिवसांचीच गोष्ट. भागी भरल्या जेवणावरून उठली आणि भडाभड ओकूं लागली.

ती फतकल मारून जमिनीवर बसली आणि ओकाऱ्या काढूं लागली. चाकरमानी धांवून आले आणि त्यांनीं तिचें डोकें धरलें.

ओकून ओकून भागीचा जीव अर्धा झाला होता. ती तशीच थकून जाऊन तेथेंच जमिनीवर पडली.

पंख्यानें वारा घालीत चाकरमानी तिला म्हणाले, "तरी मी तुला रोज सांगत असतों कीं, उन्हातानांतून बाहेर भटकत जाऊं नको म्हणून. कां गेली होतीस सकाळीं बाहेर? तुला ऊन कसं तें सोसत नाहीं. पित्ताची प्रकृति. ऊठ आतां. जाऊन पड बिछान्यावर!"

भागी कांहीं बोलली नाहीं. ती मुकाट्यानें उठली आणि बिछान्यावर जाऊन पडली.

पण पडली न पडली तोंच पुनः उठून बाहेर धांवत जाऊन ओकूं लागली. तिचा जीव अगदीं हैराण झाला.

चाकरमान्यांना कांहींच सुचेना. कारण भागी अगदीं निपचित पडली होती.

त्यांनीं लगेच गड्याला नदीपलिकडे पाठवून वैद्याला आणायला सांगितलें. तोंवर ते आपले घरगुती इलाज करीत राहिले. वैद्य येईपर्यंत दुपार झाली. वैद्य म्हातारा होता. नदीपलिकडे त्याचें घर होतें. तरुणपणीं होडीवाल्याचें काम तो करीत होता. आतां म्हातारपणामुळें तें काम त्यानें सोडलें होतें. कधीं कुणाला गरज लागली तर तो औषध द्यायला जाई किंवा औषध पाठवून देई.

चाकरमान्यांनीं घरीं बोलावल्यामुळें तो त्यांच्या घरीं मुद्दाम आला होता.

" काय होतंय् रे पोरीला, सुरबा ? "

" पित्त वाढलेलं दिसतंय्. ओकते आहे सकाळपासून."

" हं ! "

वैद्य भागीकडे गेला. त्यानें तिची नाडी तपासून पाहिली. डोळे उघडून पाहिले. जीभ पाहिली आणि भागीला म्हटलें, " जेवणावर वासना जाते का ? कीं नकोसं वाटतं ? "

भागीनें खालीं मान घातली. ती कांहींच बोलली नाहीं.

" सुरबा, पोरीनं तुझ्या नांवाला काळं फांसलं ! " वैद्य म्हणाला.

" म्हणजे ! " सुरबा आश्चर्यचकित होऊन म्हणाले.

" म्हणजे काय ! भागीला दिवस गेले आहेत."

" शक्य नाहीं. कांहीं तरी चुकलं असेल तुझ्या परीक्षेंत. माझी भागी असं कधींच करणार नाहीं ! "

" माझी भागी असं कधींच करणार नाहीं ! वेडा आहेस सुरबा ! "

सुरबा मटकन् खालीं बसले. त्यांच्या डोळ्यांसमोर अंधेरी आली. त्यांच्या अंगाचा भडका झाला. रागानें ते थरथर कांपूं लागले.

त्यांनीं जळत्या डोळ्यांनीं भागीकडे पाहिलें. भागी खालीं मान घालून अश्रू ढाळीत होती.

ते ताडकन् उठून उभे राहिले. त्यांनीं खसकन् भागीचा हात धरून तिला ओढली आणि गर्जना करून त्यांनीं विचारलें, " चांडाळणी, काय कर्म केलंस

हें ! कशी तुला अवदसा आठवली ! कां माझं तोंड नरकांत घातलंस ?" संतापाच्या भरांत त्यांनीं भागीच्या तोंडांत एक भडकावून दिली.

भागी त्या चपराकीनें खालीं कोसळून पडली. अगदीं निपचित होऊन पडली.

ते संतापानें थरथरत होते. भागीला खाऊं कीं गिळूं असें त्यांना होऊन गेलें.

ते पुनः रागानें तिला लाथ मारायला धांवले. पण भागीचा चेहरा पाहातांच ते जागच्या जागीं थबकून उभे राहिले आणि तिच्या तोंडाकडे टक लावून पाहात राहिले. हळूहळू त्यांच्या डोळ्यांच्या कडा ओलसर होऊं लागल्या. डोळे पाणी भरून वाहूं लागले, आणि क्षणांत तेही रडूं लागले.

खालीं वांकून भागीच्या अंगावर आपलें अंग टाकून ते ओक्साबोक्सीं रडूं लागले–"पोरी, काय केलंस हें ? भागी, भागी !"

त्यांनीं तिला हालवून पाहिली. कोणतीच हालचाल दिसत नव्हती. तिचा चेहरा कोमेजलेल्या फुलासारखा दिसत होता. तिचे डोळे मिटलेले होते. ओंठ रेषामात्र विलग होते.

"भागी, भागी ! बाळ तूं जागी आहेस ?"

तिचे ओंठ क्षणमात्र हालले.

चाकरमान्यांनीं पुनः हांक मारली, "बाळे, बोल ना ! मीं तुला मारलं म्हणून रागावलीस ? माझी भागी रागावली ? मीं चांडाळानं तुला मारलं ?"

भागीनें अस्फुट हांक मारली, "बाबा !"

"बाळ, ऊठ ! तुला मी मारणार नाहीं, बोलणार नाहीं—ऊठ !"

वैद्याच्या डोळ्यांकडे उपरणें गेलें होतें.

त्यानें पाणी आणून तिच्या डोळ्यांना लावलें.

भागी उठून बसली. चाकरमानी तिच्या अंगावरून हात फिरवूं लागले.

"कुणाचं काम हें भागी ?" वैद्यानें विचारलें.

पण भागीनें कांहीं त्याला नांव सांगितलें नाहीं. वैद्य निघून गेला.

दुसरे दिवशीं ही बातमी गांवांत वाऱ्यासारखी पसरली. चौंहीकडे चर्चा सुरू झाली आणि भागीनें न सांगतांही भगवानाचें नांव ज्याच्या त्याच्या मुखीं झालें.

* * *

महादेव मुद्दाम सुरबाला भेटायला गेले. सगळी हकीकत सांगितल्यावर सुरबा म्हणाले, " महादेव, आतां वर मान करून कसा मी गांवांतून हिंडूं ? कुणाचं कुत्रंही आतां मला घाबरायचं नाहीं."

" सुरबा, मनोनिग्रह करणं न् त्यांतल्या त्यांत तरुण माणसांनीं, ही सामान्य गोष्ट नाहीं. भागीचा यांत काडीएवढाही गुन्हा नाहीं. ती निसर्गाच्या मार्गानं गेली. तूं वेळींच सावध राहून जर तिचा पाट लावून दिला असतास, तर आजचा प्रकार कायदेशीर झाला असता. कुणीही विरुद्ध ब्रही काढला नसता. एकट्या लग्नबंधनानं केवढा हा फरक झाला असता ! यांत चूक झाली तुझी. भटाबामणांच्या नसत्या देखाव्याला भुललास. पांढरपेशा होऊं पाहात होतास नाहीं ! त्याचं हें फळ मिळालं तुला—"

" खरं रे ! पण आतां पुढं काय करूं तें सांग. यांतून बाहेर निघायला मार्गच नाहीं का ? "

" मार्ग एकच. भगवान बरोबर भागीला राहूं द्यायचं—लग्न करून ! "

" असं कसं होईल ? सुताराबरोबर मराठ्याचं कसं लग्न होईल."

" होईल, होईल. न होत असलं तर अशीच राहूं दे त्याच्याजवळ— "

चाकरमान्यांनीं कपाळावर हात मारून घेतला.

इतक्यांत कधीं न येणारा दाजिबा कुळकर्णी आला—त्याच्या आगमनानें सुरबांना कांहीं बरें वाटलें नाहीं. तो आज मुद्दाम आपल्याला खजील करण्यासाठीं आला आहे हें त्यांनीं ओळखलें.

" काय करणार सुरबा, आतां कांहीं तरी उपाय काढला पाहिजे यांतून." दाजिबा मानभावीपणानें म्हणाला.

त्याच्या म्हणण्यावर कुणींच उत्तर दिलें नाहीं. तेव्हां तो पुनः म्हणाला, "सुरबा, कळलं का तुला, तुझे जातवाले चिडले आहेत तुझ्यावर. वाळीत जाण्याचा प्रसंग येणार असं दिसतं. तें टाळायचं असलं तर भागीला अगोदर घराबाहेर काढली पाहिजे."

"मला वाळीत टाकणार आहेत ? खुशाल टाका म्हणावं. नाहीं तरी मी वाळीत टाकल्यासारखाच नाहीं का ? कधीं कुणाच्या घरीं जात नाहीं, कीं कुणी आमच्या घरीं येत नाहींत. आणखी निराळं वाळीत टाकायचं तें काय राहिलं आहे ? कुणाच्याही घरीं आजवर मीं हात ओला केलेला नाहीं. मग मला वाळीत जाण्याचं भय कशाला ?"

या उत्तरानें दाजिबा विरमल्यासारखा झाला. वाळीत टाकण्याची त्याचीच कारवाई होती. कुठून तरी सुरबाचा पाणउतारा करायचा, त्याला छळावें हा त्याचा उद्देश होता.

"मी आतांच फौजदाराच्या घरावरून आलों. तिथं तुझी जात बसली आहे. एक तर भागीला घराबाहेर तरी घालवून दे किंवा वाळीत तरी जायला तयार हो, असं त्यांचं म्हणणं दिसतं—"

"शक्य नाहीं भागीला घराबाहेर घालविणं !"

"जातीचा राग वाईट असतो, सुरबा ! जात चिडली तर सापाहूनही भयंकर. साप बारा वर्षांनीं तरी आपला राग विसरतो, पण जात चिडली तर बारा पिढ्या डंख ठेवते मनांत !"

आपल्या बोलण्याचा सुरबाच्या मनावर काय परिणाम होतो हें दाजिबानें थोडा वेळ अजमावलें आणि आणखी एक हत्यार बाहेर काढलें—

"यांतून बाहेर पडायला आणखी एक मार्ग आहे."

महादेव आणि सुरबा या दोघांनींही त्याच्याकडे पाहिलें. तेव्हां दाजिबा पुढें म्हणाला, "गर्भपात गुपचूप उरकून घ्यायचा न् फौजदाराच्या कनवटीला पांचपंचवीस रुपये लावायचे, कीं बिनबोभाट सारं होऊन जाईल. आपलंही काम झालं अन् फौजदारही तोंड उघडण्याचा संभव नाहीं."

सुरबा विचार करीत राहिले.

महादेवांनीं सुरबाकडे पाहिलें. सुरबांनींही त्यांच्याकडे पाहिलें. सुरबाच्या डोळ्यांतला आशय महादेवांनीं ओळखला.

" सुरबा, तुला वाळीत जाण्याचं भय वाटतं ? त्यासाठीं एका जिवाचा बळी द्यावासा वाटतो तुला ? "

" कोंबड्यांचे बळी काय थोडे देतों आपण ? " दाजिबा म्हणाला.

" माणसाचा जीव नी कोंबड्याचा जीव एकाच मापानें का मोजायचा ? कोंबडा हें कांहीं लोकांचं अन्न असतं, तसं माणसं खाणारे का आहोंत आपण ?— छे ! असं मी होऊं देणार नाहीं. "

" मग काय करायचं ! नाहक गांवच्या रोषाला पात्र होणार सुरबा ! " दाजिबा म्हणाला.

" इतकंच ना ? मी करतों सुरबाची मुक्तता ! " महादेव आवेशानें म्हणाले; " सुरबा, तूं भागीला आपल्या घरांत नको ठेवूं या उपर. भागी आजपासून माझी मुलगी. मी तिला माझ्या घरांत मुलीप्रमाणं पाळीन. भागी, भागी, चल जाऊं आपल्या घरीं—"

दाजिबा चकित होऊन नुसता पाहातच राहिला.

---

# खेडेगांवचा फौजदार

१४

भागी गेल्यामुळें सुरबा चाकरमान्यांवरचा बहिष्कार टळला हें खरें; पण भागीविना त्यांचें घर रिकामें झालें असें त्यांना वाटलें. तिच्या अस्तित्वानेंच घर कसें भरल्यासारखें त्यांना वाटे. भागीच्या मोकळया हास्यानें घराच्या कोनाकोपऱ्यांत प्रतिध्वनी उठत, तिच्या हालचालीनें घरांतील प्रत्येक वस्तु जणुं हालचाल करीत आहे असें चाकरमान्यांना वाटे.

ती भागी आतां त्यांच्या घरांत नसल्यामुळें चाकरमान्यांना उदास उदास वाटूं लागलें. त्यांनीं बरेंच दिवस स्वतःला घरांतच कोंडून घेतलें होतें, पण क्षणोक्षणीं तिच्या आठवणी होऊं लागल्यामुळें ते शक्य तेवढे बाहेरच राहूं लागले. अलिकडे रोज नदीकिनारीं जाऊन मासे गरवित बसण्याचा उद्योग त्यांनीं आरंभला होता. अगदीं सकाळीं ते नदीवर जात. खूप मासे मिळवित आणि वाटेंत भेटेल त्याला थोडे थोडे वांटीत ते घरीं रिकाम्या हातांनीं येत. आतां वरचेवर ते जाईच्या घरीं मासे नेऊन देऊं लागले. भागी महादेवांच्या घरीं गेल्यापासून ते तिकडे मुळींच फिरकले नाहींत. मनांतून त्यांचें मन ओढ घेई, पण ते मनाला आंवरीत. आणि अगदींच राहवलें नाहीं, म्हणजे जाईच्या घरीं तिला मासे घेऊन जात. तिच्या घरांत जाऊन बसण्याइतकी त्यांच्या मनाची तयारी नव्हती. अगदीं आंत जाऊन बसावें असा मोह त्यांना होई, पण दारांत उभ्या उभ्या थांबूनच तिच्याशीं ते बोलत राहात. ते जाईशीं बोलतांना आपल्या

अंतःकरणांतील वात्सल्याचाच जणूं तिच्यावर वर्षाव करीत. जाई त्यामुळें भारावून जाई.

ते अर्जुनाचीहि चौकशी करीत. अर्जुन मुंबईला एका गिरणींत नोकरीला राहिला असें समजलें त्यांना. मुंबईच्या महार—सेवा—संघांतही तो कार्य करूं लागला होता. सुरबांना तें ऐकून आनंद वाटला.

काळू मात्र नदी पैलाडी गुरें राखीत होता. कधींमधीं अवचित येऊन तो जाईला भेटून जाई.

एकदां जाईनें सुरबाला विचारलें, " बाबा, तुम्ही भागीला घरांत कां नाहीं आणीत? इतक्यांत तिचे दिवसही भरायला येतील. माझ्यासारख्या परजातीच्या—महार मुलीवर तुम्हाला माया करतां येते, मग पोटच्या मुलीवर इतके कसे निष्ठुर होतां?"

" असंच आहे हें, जाई! मोठं विचित्र असतं मन. म्हणून तुझ्यावर माया करतों. तूंच माझी मुलगी; जाई!" सुरबांच्या डोळ्यांत पाणी चमकूं लागलें. " त्या पोरीनं केवढा आघात केला आहे माझ्या मनावर! महापुरांत झाड जसं मुळासकट उपटून पडतं तसं माझं झालं आहे. माझ्या साऱ्या शक्ती मला सोडून जात आहेत असं मला वाटतं. तूं उद्यां तशीच निघालीस तर तुझ्यावर मी राग करणार नाहीं, पण भागी—भागी पोटची मुलगी आहे. पोटची मुलगी स्वतःच्या जन्माबरोबर घराण्याची अब्रूही घेऊन येते. ती अब्रु तिनं जोंवर कायम ठेवली असेल तोंवर तिचं माहेरचं प्रेमस्थान कायम राहतं. जोडलेली माया तशी नसते. जोडलेली माया कसलाही लोभ करीत नसते. ती गुणांअव-गुणांकडे दुर्लक्ष करते. तिचं प्रेमस्थान अभंग राहातं. माझं म्हणणं तुला मोठं विचित्र वाटेल खरं, पण तें अगदीं खरं आहे. म्हणूनच भागी पुनः येऊं शकत नाहीं."

जाई उगी राहिली. सुरबांविषयीं तिचें मन सहानुभूतीनें वाहून जात होतें. तिनें कळवळून म्हटलें, " बाबा, मी तुमच्या जातीची असतें तर किती बरं होतं. तुम्हीं माझ्या घरांत आलां असतां, घोटभर पाणी तरी प्यालां असतां माझ्या हातचं—"

" खरंच जायू, मलाही तसंच वाटतं. मी महार असतों तर बरं झालं असतं, असं वाटूं लागतं. तुला पोटाशीं घेऊन पोटभर रडलों तरी असतों. आज रडायलाही माझं कुणी नाहीं. ही जात मोठी वाईट आहे ! "

जाई मनांत म्हणाली, ह्याच भगवान जर मराठा असता तर भागीशीं त्याचें लग्नही झालें असतें.

" बाबा, सुतारांवर गांवकऱ्यांनीं बहिष्कार घातला आहे. कळलं का तुम्हाला ?"

"गेले मसणांत ते सुतार ! चांडाळानं आज माझ्या पोरीची ताटातूट केली. चांगलं झालं ! "

" काय चांगलं झालं बाबा ? एकट्या भगवानाच्या अपराधाबद्दल साऱ्या सुतारांना काय म्हणून दंड ? फार तर भगवानाला काय तें करायचं होतं—"

" त्या मांगाचं नांव नको काढूंस माझ्यासमोर—" दांतओंठ खात चाकरमानी म्हणाले, " असा समोर दिसला तर नरडीचा घोंट घेईन त्याच्या ! "

सुतारांवर गांवकऱ्यांनीं बहिष्कार घातला होता हें खरें होतें. गांवकरी बाहेरून सुतार बोलावूं लागले होते. शक्य तेवढ्या त्यांच्या मार्गांत अडचणी आणायच्या असा त्यांनीं घाट घातला होता. सुतारानें आपलें कूळ बुडविलें म्हणून हे सारे प्रयत्न होते. सुतारही हट्टास पेटले. त्यांनीं गांवकऱ्यांची अडवणूक होईल असे प्रयत्न चालविले.

त्यामुळें गांवांत आणखी दोन पक्षांची भर पडली. कांहीं गांवकर सुतारांच्या बाजूचे होते. यांत मुख्यतः फौजदार आणि दाजिबा यांच्याविरुद्ध असलेल्यांचा भरणा होता. दसरा प्रकरणामुळें गांवकऱ्यांत मोठी तेढ आली होती त्यामुळें एका पक्षानें उघड उघड सुतारांची बाजू घेतली. त्यांनीं संगनमतानें ठरविलें, कीं दसऱ्याच्या वेळच्या अपमानाची जर भरपाई झाली नाहीं, आणि सुतारांवरील बहिष्कार उठविला नाहीं, तर दाजिबाचा चालू वर्षाचा खंड आणि मागील बाकी कुणीच द्यायची नाहीं; तसेंच पुढील वर्षीं दुसरा स्वतंत्र दसरा करायचा.

या नव्या प्रकरणानें गांवांतील शांतता बिघडून गेली. आणि महादेवांचें मन अस्वस्थ झालें. गांवांत नवी शाळा स्थापन करण्यासाठीं त्यांनीं सरकारांत

अर्ज केला होता, आणि त्या अर्जाचें उत्तरही आलें होतें. सरकार कांहीं मदत देऊं शकलें असतें. महादेव पुनः शाळा काढण्याच्या विचारांत होते.

इतक्यांत गांवांत अशी तेढ निर्माण झाल्यामुळें त्यांचा जीव खालींवर होऊं लागला.

फौजदाराला बोलावून आणून त्यांनीं सरकारी उत्तर दाखविलें, तेव्हां फौजदारानें उत्तर केलें, "सरकारचा मला तसा खास हुकूम आल्याखेरीज मी कांहींच करूं शकत नाहीं. अन् गांवांत केवढे तुम्ही उपद्याप करून ठेवले आहेत! सुरबाच्या मुलीला घरांत बाळगली. गांवांत अशीं वैरं —"

"फौजदार, गावांतलीं वैरं काय–आज आहेत उद्यां नाहींत. तुम्ही आम्ही बसलों एकत्र तर एका बैठकींत मिटवूं सारे तंटे. येतां का? बोलवा गांवसभा. सगळे मिळून एकमेकांच्या संमतीनं मिटवूं सारं. पण शाळेचं तसं नाहीं. आपलीं मुलं शहाणीं झालीं पाहिजेत. त्यांना आज जर लिहितां वाचतां येऊं लागलं तर उद्यां त्यांना मोठेपणीं आपलं हिताहित कळूं शकेल, नि मग असलीं भांडणं न् तंटे मुळीं उद्भवणारच नाहींत."

"जशीं कांहीं शिकलेलीं माणसं भांडतच नाहींत? तो गांधी एवढा शिकला —बालिष्टरची परीक्षा देऊन आला आहे, तरी वेड्यासारखा सरकारशीं स्वराज्या-साठीं भांडतोच आहे! मग?" फौजदारानें ऐटींत प्रश्न केला.

या महामूर्खाशीं काय बोलावें हेंच महादेवांना सुचेना. ते म्हणाले, "तीं भांडणं निराळीं फौजदार. तीं भांडणं आपल्या देशासाठीं आहेत अन् हीं भांडणं काय क्षुल्लक कारणांसाठीं!"

पण फौजदाराचें समाधान कांहीं झालें नाहीं. आणि समाधान व्हावें अशी तरी त्याची कुठें इच्छा होती? गांवचा तंटा मिटविण्याच्या प्रश्नाला तर त्यानें बगलच दिली.

महादेवांना दिसून आलें–लहानशा गांवचा फौजदार पण हा प्राणी इंग्रजापेक्षांही धूर्त असतो. तो गांवांत न्यायाचा तराजू घेऊन नेहमीं हिंडत असतो. कुठें कांहीं भानगड दिसली कीं दोन्ही पारड्यांत दोन बाजू टाकून खालीं गेलेल्या पारड्यांतला जादा भाग आपल्या तोंडांत टाकीत असतो. याचें शिक्षण म्हणावें

तर अकटश्वविकटो. सही धडपणें करतां येत नसली तरी असे सफाईदार फांटे मारतो कीं त्यापुढें गव्हर्नरची सहीही फिक्की ठरेल. मामलेदारापासून कलेक्टरापर्यंत साऱ्यांच्या घरीं याला प्रवेश. आणि यावर त्यांचा विश्वास. हा साऱ्या अधिकाऱ्यांत शेवटच्या दर्जाचा असला तरी गांवचे जणुं आपण गव्हर्नर आहों अशा थाटांत तो वावरत असतो. वर्षाला याला बारा रुपये पगार—म्हणजे १९२ आणे किंवा त्याला गुणिले बारा एवढ्या पया. पण त्याची ऐट आठशें—बाराशें रुपये मिळवणाऱ्या कलेक्टरालाही येणार नाहीं.

गांवचें राजकारण याच्या बुद्धीवरच लढलें जातें. त्या कामांत तो इंग्रजांचें अनुकरण सहीसही करतो. इंग्रजांच्या कृपेनें आपल्या देशांत जसे हजारों पक्ष आहेत तसे याच्या कृपेनेंही दर गांवांत पांचदहा पक्ष तरी असायचेच. इंग्रज भेदनीतीवर राज्य करतात, तर हाही याच नीतिशास्त्राच्या आधारावर आपला चरितार्थ चैनींत चालवित असतो. थोड्याशा रुपयांपर्यंत दंड करण्याचा अधिकार याला असतो. तो अधिकार म्हणजे माकडाच्या हातांत सांपडलेलें कोलीतच असतें. माकडाच्या हातांतील कोलितानें कुणाच्या घराला आग लागेल याचा नेम नसतो, तसें फौजदाराच्या हातांतील हा दंडाचा दंडक केव्हां कुणाच्या डोक्यावर येऊन बसले याचा नेम नसतो. या प्राण्याला केव्हां केव्हां गांवचा कुळकर्णी नांवाचा याच्याच जातीचा प्राणी सर्व प्रकारचें सहाय्य करीत असतो. हे दोघे प्राणी एकत्र आले कीं कोणत्याही चांगल्या कार्याचे तीनतेरा झालेच म्हणून समजावें !

महादेवांना तरी असा अनुभव येत होता. त्यामुळें त्यांचें मन उदास होऊन गेलें.

---

## आमच्याच रक्ताचीं माणसें १५

कार्तिक महिन्यांत कडाक्याची थंडी पडली. नदीच्या पाण्यांतून सकाळीं गरम गरम वाफा निघूं लागल्या. धुक्यानें डोंगरझाडी दडून गेली. सकाळीं उठून लोक पाचोळा पेटवून शेक घेऊं लागले. सूर्याचीं कोवळीं किरणें पडतांच मुलें आणि म्हातारींशितारीं माणसें उन्हांत बसून भोपळी घेऊं लागलीं. झाडांच्या बुंध्यावर मांजरें पडून राहून अंगावर उन्हें घेऊं लागलीं.

अशा वेळीं महादेव ठाकूर रात्रीं देवळांत दहिंकाल्याला गेलेले परत येत होते. नदीपैलाडीच्या गांवीं ते दहिंकाल्याच्या जत्रेला गेले होते. लहानपणीं त्यांनीं दहींकाले पाहिले होते. त्या दहिंकाल्यांतील शंकासूर आणि माधवी त्यांना अजूनही आठवत होतीं. त्यांचें पुनः दर्शन घेण्यासाठीं ते मुद्दाम रात्रीं गेले होते.

पण शंकासुराच्या आणि माधवीच्या विनोदांत त्यांचें मन रमलें नाहीं. त्यांनीं दहिंकाल्याच्या जत्रेंत एक फेरी मारून पाहिलें, तों ठिकठिकाणीं जुगाराचे अड्डे बसलेले होते. लहानथोर, उच्चनीच, श्रीमंतगरीब सारेजण जुगार खेळत होते. पैसा दोन पैशांपासून रुपया दोन रुपयांपर्यंत पैसे लावून जुगार खेळला जात होता. बंदोबस्तासाठीं असलेले पोलिसही त्यांत भाग घेत होते. तें पाहून त्यांना मोठें आश्चर्य वाटलें. कुंपणच जर शेत खाऊं लागलें तर बाहेरचीं गुरेंढोरें आंत शिरणारच. तेथें लोक पोलिसांचें अनुकरण करीत होते.

घरीं परत येतांना हेच विचार त्यांच्या मनांत घोळत होते. लोकांना

अधोगतीला नेणारें हें व्यसन राजरोसपणें चालावें याचा त्यांना उद्वेग आला. लोकांना याची जाणीव करून दिली पाहिजे असें त्यांना तीव्रतेनें वाटूं लागलें.

संध्याकाळीं ते मुद्दाम सुरबांच्या घरीं गेले. महादेवांना पाहून सुरबाना भागीची चौकशी करावी असें वाटूं लागलें. पण त्यांनीं तो विचार संयमानें दाबला. महादेव सुरबांना म्हणाले, " सुरबा, एक नवी मोहीम सुरू करायचं ठरवलंय् मी. तुझं सहाय्य हवं आहे ! "

" माझं सहाय्य तुला केव्हांही मिळेल. काय ठरवलं आहेस? कसली मोहीम ? "

" जुगाराविरुद्ध. सध्यां दहिंकाले सुरू झाले आहेत. काल रात्रीं पैलाडी दहिंकाल्याला गेलों होतों. तेथें जुगाराचे किती तरी अड्डे बसले होते. शेकडों लोक जवळची दमडी दुगाणी नेऊन त्या जुगारांत घालवित होते. केवढी ही हानी होत आहे; नि लोकांचा केवढा नैतिक अधःपात होत आहे ! "

" तूं काय करणार आहेस तेथें जाऊन? "

" लोकांपुढें जाऊन भाषण करून त्यांना जुगारापासून होणारे तोटे समजावून सांगणार— "

" नि जुगारापासून होणारे फायदेच त्यांनीं तुला समजावून सांगायला सुरवात केली तर ? "

" अशी थट्टेवारी नेऊं नकोस ही गोष्ट सुरबा ! या जुगारापायीं आज सत्त्यानाश होतो आहे शेतकऱ्यांचा. घरांतले दागदागिने जुगाराच्या अड्ड्यावर जाऊन पडत आहेत. जवळ असलेला एक पैसाही चालून जात आहे ! "

" कबूल आहे मला हें. पण लोक जुगार कां खेळतात हें माहीत आहे तुला ? नाहीं ? मग ऐक सांगतों ! मुंबईचे लक्षाधीश जुगार कां खेळतात— घोड्यांच्या शर्यती कां खेळतात ? करमणूक म्हणून ? छे ! लाखाचे दोन लाख करण्यासाठीं – पैशाच्या लोभासाठीं. खेड्यापाड्यांतले लोकही जुगार खेळतात ते याचसाठीं, पैशाचे दोन पैसे व्हावेत म्हणून. कष्ट करूनही आज खेड्यांत पैसा दिसत नाहीं, तेव्हां या मार्गानं तरी दोन पैसे मिळतील असं वाटतं त्यांना.

नशिबावर हवाला ठेवून ते जुगार खेळतात. त्यांना का कळत नाहीं, जुगार खेळणं वाईट आहे तें ! पण लोभ आहेना ! लोभापुढें विवेक मागं पडतो. त्यांना मोह आवरत नाहीं. शहरांतला जुगार बंद झाला आहे का ? नाहीं ना, मग इथलाही बंद होणं शक्य नाहीं. शहरांत कायदेशीरपणें चालतो; पण इथं कायदा कुणी पाळीतच नाहीं. कायद्याचे पाळेगारही पाळीत नाहींत, मग इतरांची काय कथा ? म्हणून म्हणतों जुगार बंद होणं शक्य नाहीं. जोंवर आयते दुप्पट, पांचपट, हजारपट न् लाखोंपट रुपये मिळण्याचं आमीष आहे न् माणसाला पैशांचा मोह आहे, तोंपर्यंत हें असंच चालायचं. शहरांत शिकलेल्या माणसांना हा मोह सोडवत नाहीं, मग अशिक्षितांचं काय म्हणतोस बाबा!”

महादेवांना जगन्नाथाच्या पत्रांतील ओळींची नेमकी या वेळीं आठवण झाली. जगन्नाथानें लिहिलें होतें—‘ खेड्यांची सुधारणा व्हायला अगोदर राजसत्ता आमच्या हातीं आली पाहिजे. एकदां सत्ता हातीं आली कीं खेडीं एका क्षणांत सुधारतां येतील.’

महादेवांना वाटलें — खरेंच परकी सत्ता या गोष्टी करूं शकणार नाहीं. परकी सत्ता आमच्या हातीं असली तरी तिचीं सूत्रें आमच्या हातांत नाहींत. नाकांत वेसण घातलेल्या बैलाला स्वातंत्र्य तें काय असणार ? ज्याच्या हातांत वेसणीची दोरी असेल त्याच्या मर्जीनुसार त्या त्या दिशेनें वळावें लागतें. परकी सत्ताही असेंच करते. म्हणूनच आमच्याच रक्ताचे फौजदार आणि पोलिस आमचेच वैरी होतात.

“ तुझं म्हणणं खरं आहे, सुरबा. तरीही मला वाटतं, आपलं कर्तव्य आपण करावं; यश येवो वा न येवो. आज आपल्या गांवची दहिंकाल्याची जत्रा आहे. तूं आलं पाहिजे माझ्याबरोबर.”

“ जशी तुझी मर्जी!”

त्या रात्रीं महादेव ठाकूर आणि सुरबा जत्रेला गेले. जत्रेच्या ठिकाणीं देऊळ नुसतें माणसांनीं — स्त्रीपुरुषांनीं फुलून गेलें होतें. रात्रीं दोनअडीच वाजतां दशावतारी खेळ सुरू व्हायचे असले तरी संध्याकाळपासूनच लोकांची गर्दी व्हायला लागली होती.

देवळाच्या बाहेर रस्त्याच्या दुतर्फा मेवामिठाई आणि खेळणीं यांच्या दुकानांची रांग लागली होती. याशिवाय अनेक प्रकारचे छोटे छोटे व्यापारी आपलीं छोटीं छोटीं दुकानें मांडून बसले होते.

चोहींकडे कसा गजबजाट माजून राहिला होता. त्यांत लहान मुलें शिट्या वाजवून भर टाकीत होतीं.

या गर्दीच्या रहदारीच्या पलिकडे शेतांत गॅसचे दिवे पेटवून ठिकठिकाणीं जुगार चाललेला होता. प्रत्येक ठिकाणीं वीसपंचवीस जणांचें टोळकें वाटोळें बसून पैसे लावीत होतें; कुणी हरत होते—मिळवणारा क्वचितच आढळत होता.

महादेव त्या प्रत्येक ठिकाणीं जाऊन लोकांना सांगत होते:—'मित्रहो, जुगार खेळूं नका. जुगारानें माणूस कुचकामाचा होतो. जुगार खेळणें हा कायद्याच्या दृष्टीनें गुन्हा आहे. शास्त्रांत जुगार निषिद्ध मानला आहे. पांडवांनीं जुगारानें आपला सर्वनाश करून घेतला!'

त्यांचें असें बोलणें सुरू झालें म्हणजे लोक आश्चर्यभरानें क्षणभर त्यांच्याकडे पाहात आणि पुनः आपल्या कार्याला लागत.

"जशी कांहीं जुगार म्हणजे दारूच!" कुणी तरी बोलले.

"जुगार हा एक खेळ आहे. पत्त्यांचा डाव नाहीं का आपण खेळत? त्यांतलाच एक प्रकार."

"पांडवांचा सत्यानाश झाला तो बरोबर आहे—त्यांना चांगलंसं खेळतांच येत नसलं पाहिजे!"

आणि पुनः जोरांत काम चालू होई.

तरी महादेवांनीं आपलें काम सोडलें नाहीं. ते सारखे फिरत होते. हळुहळू त्यांच्यामागून तमासगीरही फिरूं लागले. अजून लिलावाला खूप अवकाश होता म्हणून लोक त्यांच्यामागून जमावाने फिरूं लागले. कुणी शिट्या फुंकूं लागले. कुणी उगाच कांहीं तरी अश्लील कोट्या करून हंसूं लागले. आस्ते आस्ते त्यांच्या जमावाला मिरवणुकीचें स्वरूप आलें.

एके ठिकाणीं जुगार चालला होता तेथें ते आले. तेथें दाजिबा आणि फौजदार जुगार खेळत बसलेले महादेवांनीं पाहिलें.

दाजिबा आणि फौजदार या दोघांनींही त्यांच्याकडे पाहिलें. दोघेही ओशाळले, पण क्षणांत त्यांनीं आपणाला सांवरून घेतलें.

महादेवांनीं आपलें व्याख्यान सुरू केलें. व्याख्यान सुरू करतांच लोकांची गर्दी त्यांच्याभोवतीं गोळा झाली. महादेवांना त्यामुळें स्फूर्ति आली. त्यांनीं मोठ्या उच्च स्वरांत बोलायला सुरवात केली.

दाजिबानें फौजदाराला डोळा घातला; आणि ते दोघेही तेथून नाहींसे झाले.

महादेवांचें व्याख्यान ऐकायला लोकांची गर्दी सारखी वाढत होती. खेडयांतल्या लोकांनीं असें वक्तृत्व कधीं ऐकलें नव्हतें. त्यांत त्यांच्याच हिताची तरफदारी चाललेली. मग लोक त्यांत तन्मय झाल्यास नवल नाहीं. ते व्याख्यानांत अगदीं रंगून गेले.

पण इतक्यांत रंगाचा भंग झाला. कुठून तरी दगड येऊन पडूं लागले. दगड सारखे येऊं लागले. लोकांचीं टाळकीं त्यामुळें चांगलींच शेकूं लागलीं. लोकांची पांगापांग होऊं लागली. लोक सैरावैरां इकडे तिकडे, वाट मिळेल तिकडे धांवूं लागले. चोंहीकडे एकच गोंधळ उडाला. आरडाओरड सुरू झाली आणि शिट्या, कुकारे यांना ऊत आला.

कुठून तरी एक दगड आला आणि महादेवांच्या डोकीवर बसला. त्या धक्क्यानें ते खालीं कोसळून पडले.

सुरबांनीं त्यांना सांवरलें तेव्हां त्यांच्या डोक्यांतून रक्ताच्या धारा वाहात असल्याचें त्यांना कळून आलें.

अंधार तर गडद होता. लोक तर सैरावैरा धांवत होते. काय करावें हेंच सुरबांना समजेना.

समोरून कुणी तरी कंदील घेऊन चालला होता त्याला त्यांनीं हांक मारली. कंदीलवाला पुढें आला. त्यानें कंदील वर करून पाहिलें आणि म्हटलें, " कोण-सुरबा ? न् हें कोण खालीं ? महादेव ठाकूर ? काय झालं ? पडले बिडले कीं काय ? "

" दाजिबा, महादेवाच्या डोकीला दगड लागला आहे. त्याला उचलून नेला पाहिजे इथून. आपण दोघांनीं नेऊं त्याला पलिकडे. मग कांहीं तरी उपाय करतां येतील."

महादेव कण्हत होते. त्यांना दोघांनीं उठवून हळुहळू चालवित जवळच्या एका चहाच्या दुकानावर नेलें. त्यांच्या डोकीवर पट्टी बांधली.

महादेव चांगले शुद्धीवर आले तेव्हां पहांट होऊन पूर्वेकडे नुकतेंच तांबडें फुटूं लागलें होतें. आणि जत्रा संपल्यामुळें लोक घराकडे परत जात होते.

---

## प्रेताची विटंबना १६

महादेव ठाकूर घरीं आले तेव्हां त्यांना कळलें, कीं भिकू सुतार हृदयक्रिया बंद पडून एकाएकीं मरण पावला. ते तसेच डोकीला रुमाल गुंडाळून भिकूच्या घराकडे गेले.

भिकूच्या घराजवळ त्यांना अगदीं सामसूम दिसलें. जणुं तेथें स्मशानकळा आलेली होती. कुणी चिटपांखरूं तेथें दिसत नव्हतें.

महादेव दरवाजावर जाऊन उभे राहिले. त्यांनीं आंत डोकावून पाहिलें— आंत एका जुनाट माच्यावर भिकूचें प्रेत पडलें आहे आणि भगवान कोंपऱ्यांत डोकें खुपसून बसला आहे.

"काय रे भगवान ? असा बसून काय राहिला आहेस ? भिकू कधीं गेला ?"

भगवान भळभळां अश्रू ढाळून अगोदर रडला. आणि थोड्या वेळानें म्हणाला, "सारी रात्र तळमळत होता. मीही त्याच्याबरोबर जागत होतों. पहांटेच्या सुमारास एक मोठी उचकी आली, आणि—"

"असं ? कांहीं बोललाबिलला का तुझ्याबरोबर ?"

"नाहीं. तसं कांहीं नाहीं. पण एकदां रात्रीं म्हणाला होता—भगवान, उगाच मी तुला जन्म दिला. बाप होऊन तुझं लग्नसुद्धां करून देतां आलं नाहीं मला !"

म्हातारा मरेपर्यंत मुलाच्या लग्नाचा ध्यास धरून राहिला होता. याची महादेवांना पुरेपूर खात्री पटली.

त्यांनीं भगवानाला विचारलें, " भगवान, आतां पुढील व्यवस्था लावायची ना ? तुझे जातवाले कुणी कसे आले नाहींत ते ? इथं तर कुणीच दिसत नाहींत."

" नाहीं यायचेत ते. जातवाल्यांनीं आम्हाला वाळींत टाकलं आहे."

" कां रे बुवा ? कां जातीबाहेर टाकलं आहे ? अं ? "

भगवान कांहीं बोलला नाहीं. महादेवांनीं तर्क करायचा तो केला.

" शेजारीं तुझा मामेभाऊ राहातो ना ? तोही नाहीं येत ? "

" नाहीं. तो म्हणतो—मला जातीच्या शब्दाबाहेर जातां येत नाहीं."

" बरं तो पलिकडचा—तो तुझा सख्खा चुलत भाऊ लागतो ना ? "

" तोही येत नाहीं. काय करणार ? म्हणतो – मनांत असूनही येतां येत नाहीं मला. "

" मग काय करणार आहेस तूं ? गुरांसारखा ओढत का न्यायचा तुझ्या बापाला ? "

" तोच विचार करतों आहे. पण कुठें न्यायचा हें समजत नाहीं."

" कां रे ? स्मशानांत नाहीं का न्यायचं ? पुरणार आहेस का बापाला ? "

" स्मशानांत जायची बंदी झाली आहे आम्हाला. तुम्हांला नाहीं कळलं ? "

" स्मशानांतही बंदी झाली आहे ? अन् कां ती ! "

" कां तें काय सांगूं ? ज्या कारणासाठीं जातीबाहेर काढलं त्याच कारणासाठीं स्मशानबंदी—"

" कधीं झालं असं हें ? मला नाहीं कसं कळलं ? कां नाहीं कळवलंस मला ? "

" काल संध्याकाळचीच गोष्ट ही. जातीची सभा भरली होती. त्यांनीं ठरवलं आम्हांला जातीबाहेर टाकायचं. न् त्या धक्क्यानंच बाबा बिछान्यांत पडला अन् त्या धस्तीनंच मेला."

महादेवांचें अंतःकरण कळवळून आलें. त्या धास्तीनें भिकू मेला तर. केवढा आघात बसला असेल त्या वृद्ध मनावर जातगंगेचा निर्णय ऐकून !

" सकाळीं कुणी समाचाराला तरी आलं होतं का रे ? "

" म्हातारी मामी तेवढी आली होती. तिनंच सांगितली ही स्मशानबंदीची बातमी. आमच्या स्मशानांत प्रेत जाळूं देणार नाहीं म्हणतात."

" बरं मी जाऊन येतों त्यांचं काय म्हणणं आहे तें ऐकून. येत असले तर पहातों." असें म्हणून महादेव सुतारवाड्यांत गेले. तेथें रिकामटेकडी मंडळी पुढें काय होतें तें पाहायला उभी होतीच.

" काय रे ? जातवाल्याला कुजतच ठेवणार आहांत काय ? जातीचा अभिमान तुम्हाला कांहींच नाहीं ? " महादेवांनीं विचारलें.

महादेवांना एकेकांनीं कशीं उत्तरें दिलीं :

—" असं कसं होईल ? जातीच्या अभिमानानंच तर हें सारं करतों आहोंत. आमच्या जातीला कलंक लागूं नये म्हणून हें सारं चाललं आहे ! "

—" घरंदाजांच्या पोरी बिघडविणारा आमच्या जातींत नको. गांवकऱ्यांच्या अब्रूची चाड आम्हालाही असली पाहिजे. अन् सुरबा तर आमच्या पक्षाचा. भगवानाला शिक्षा नाहीं केली तर आमचे गांवकरी काय म्हणतील आम्हांला ? "

" पण स्मशानांत बंदी करतां येणार नाहीं तुम्हांला. " महादेव म्हणाले.

" पण नेणार कोण प्रेत तिथें ? लांकडें कोण आणून टाकणार ? लांकडें कोण तोडणार, कोण फोडणार ? "

" खरंच, तुम्ही नाहीं लांकडं तोडायला येणार ? "

" छे ! कुणीच यायचं नाहीं. मग स्मशानांत प्रेत नेऊन करणार काय तुम्ही ? "

महादेवांना मोठा विचार पडला. त्यांना चीड आली. आणि कौतुकही वाटलें त्यांच्या एकजुटीचें. नीतिबाह्य वर्तन करणाराला समाज — अगदीं दुर्बल समाज केवढें कडक शासन करूं शकतो याचें प्रत्यंतर त्यांना पाहावयाला मिळत होतें. पुष्कळ वेळां या बलाचा भलत्या कामीं उपयोग होतो एवढेंच. कायदा भगवानाचें शासन करूं शकत नव्हता. पण समाजाचा कायदा केवढा प्रभावी !

" मला वाटतं, तुम्ही या बाबतींत भगवानाला क्षमा करावी. त्याच्या पापाचं प्रायश्चित्त त्याच्या मृत बापाला देऊं नका. भगवानाला काय वाटेल तो दंड करा, पण त्या प्रेतावर कसला सूड उगवतां ? "

" आमच्या हातीं कांहींच राहिलेलं नाहीं."

महादेव परतून आले.

त्यांचा चेहरा पाहूनच भगवान काय तें समजून चुकला.

" भगवान, तुझ्या बापाला आज मलाच खांदा द्यावा लागणार ! "

" पण न्यायचं कुठं प्रेत ? स्मशानांत नेऊन तिथं लाकडं कोण आणणार ? अन् कुठून आणायचीं ? "

महादेव क्षणभर स्तब्ध राहिले आणि निश्चयानें म्हणाले, " दोन कुऱ्हाडी पाजळून घे न् चल माझ्याबरोबर ! "

" अन् जायचं कुठं ? "

" मी सांगेन तिथं यायची तयारी आहे ? "

भगवान त्यांच्या पाठोपाठ निघाला.

महादेव जवळच्या डोंगराच्या बाजूनें निघाले. तेथें आपल्या स्वतःच्या मालकीच्या जमिनींतील एका लहानशा आंब्याच्या झाडाकडे अंगुलीनिर्देश करून ते म्हणाले, " भगवान, हें झाड तोडायचं. वर चढून साऱ्या फांद्या तोडून टाक."

अर्ध्या पाऊण तासाच्या आंत दोघेही पाडलेल्या फांद्या कुऱ्हाडीनें फोडूं लागले. बाजूला लांकडांचा ढीग पडला.

कपाळावर आलेला घाम उजव्या हाताच्या अंगठ्याजवळील बोटानें पुशीत महादेव म्हणाले, " भगवान, तुझ्या घरीं असतील नसतील तीं सुकीं लांकडें घेऊन ये भरीला. जा ! "

थोड्या वेळानें भगवान लांकडें घेऊन आला. त्यानें दोनतीन खेपा घातल्या तेव्हां महादेव म्हणाले, " चल भगवान, भिकूला घेऊन येऊं."

भगवान कांहीं बोलला नाहीं.

भिकूचा देह तो काय असणार? एकट्या भगवाननें त्याला खांद्यावर टाकला आणि दोघेही डोंगराच्या पायथ्याशीं आले.

भगवाननें चिता रचली. त्यावर भिकूचा मृत देह ठेविला.

" भगवान्, घाबरूं नकोस. ही जमीन माझी आहे. जाब द्यायला मी जबाबदार आहें. हं, चल पेटव चिता."

" भटजीशिवाय कशी चिता पेटवायची ? "

" आज या ठिकाणीं भटजी येणार नाहीं भगवान्. अन् माझ्यासारखा ब्राह्मण येथें असतांना तुला भटजी कशाला हवा ? चल, लाग आपल्या कामाला."

भगवान चिता पेटविणार इतक्यांत फौजदार, दाजिबा आणि कांहीं गांवकर मंडळी तेथें येऊन दाखल झाली.

" ठाकूर, तुम्ही काय चालवलं आहे हें ? " फौजदार म्हणाला. " वाटेल तेथें स्मशान बनवलं तर कायद्याच्या कचाटींत याल बरं—"

" फौजदार तुम्ही आलां ? बरं झालं. तुमच्या साक्षीनं साऱ्या गोष्टी होऊं द्या." महादेव म्हणाले. " या भिकूचं प्रेत दहन करायला कुणीच तयार नाहींत. त्याचे जातवाले येत नाहींत अन् गांववालेही येत नाहींत. काय करायचं बोला ? तुम्ही आणतां माणसं ? माणसांची मदत देत असाल तर स्मशानांत नेऊं प्रेत. अजूनही वेळ आहे."

" मी माणसं कशीं देणार ? मी कुणावर कशी सक्ती करणार ? जें बेकायदेशीर दिसलं तेवढं सांगायला आलों मी. माझं काम मीं केलं ! "

" तुमचं तुम्हीं काम केलं. आतां माझं मी करतों. तुम्ही कुणीच मदत करायला येत नाहीं. म्हणून मी प्रेत इथंच जाळणार. कळलं ? मग त्याचे परिणाम वाटेल ते होवोत."

" मी तुम्हाला हरकत करीन ! "

" अन् प्रेत कोल्ह्याकुत्र्यांकडून खाववीन. असंच ना ? फौजदार, तुमच्या हरकतीला मी आतां विचारीत नाहीं. चल रे भगवान, पेटव चिता. जमीन माझी आहे."

" परिणाम वाईट होतील ठाकूर—"

" त्याला तयारी आहे माझी."

भगवानानें चिता पेटविली. थोड्या वेळानें चिता भडभड पेटूं लागली. भिकूच्या प्रेताची विटंबना थांबली.

फौजदार दांतओंठ खात निघून गेला.

---

## गुलामांची जागृती १७

" रामराम, बाबा ! "

महादेवांनीं मान वर करून पाहिलें: समोर अर्जुन उभा आहे. अर्जुनाला पाहून त्यांना आनंद वाटला. हातांतील कागदपत्र बाजूला ठेवून ते लगबगीनें म्हणाले, " अर्जुन ये ! बैस असा. कधीं आलास तूं ? "

" आजच सकाळीं आलों मी. आलों तो लगेच तुम्हाला भेटायला आलों आहें." ओटीवरील बांकावर बसतां बसतां अर्जुन उत्तरला.

" काय मुंबईची खबरबात ? संप झालाय् मुंबईला सध्यां असं नुकतंच वाचलं—"

" हो. नी संप झाल्यामुळंच मी गांवीं आलों."

" नोकरीवर जात नाहींस वाटतं ? "

" संपच पुकारल्यावर नोकरीवर कसा जाणार ? "

" म्हणजे ! संपवाल्यांपैकींच तूं एक आहेस ! "

" हो ! "

त्यानंतर त्या दोघांचीं मुंबईच्या संपाबद्दल बराच वेळ बोलणीं झालीं. अर्जुन गेल्यावर गांवांत काय काय घडामोडी झाल्या त्याही त्यांनीं अर्जुनाला सांगितल्या.

" अर्जुन, तूं मुंबईला आतां परत जाऊं नकोस. इथंच राहा. तूं नी मी गांवांत काय करतां येईल तें कार्य करूं या ! "

" तें आतां कधींच शक्य नाहीं. मुंबईला मला गेलंच पाहिजे. तिथं केवढं तरी कार्य आम्हाला करायचं आहे. नि इथं गांवांत काय करायचं राहून? जन्मभर गांवाच्या लाथा खातच राहायचं ना?"

" असं कां म्हणतोस? गांवची सेवा हें काय कमीपणाचं समजतोस?"

" कमीपणाचं नसलं तरी निरर्थक मात्र आहे. ज्यांनीं आज शेंकडों नव्हे हजारों वर्षे आमचा छळ चालवला आहे त्यांची सेवा करण्यांत मला तरी आनंद नाहीं वाटायचा."

" मुंबईला गेल्यापासून आंबेडकरपंथाचं वारं लागलेलं दिसतं तुला —"

" खरं आहे तें. मुंबईला गेल्यापासून माझी दृष्टि सुधारली न् मी ठरवलं, जें काय करायचं तें आतां आपल्या जातीसाठीं करायचं – अस्पृश्यांच्या उद्धारासाठीं करायचं. त्यासाठीं प्राणही अर्पण करायला माझी तयारी आहे. पण ज्यांनीं आम्हांला गाढ अंधःकारांत कित्येक शतकेंच्या शतकें ठेवलं त्यांच्यासाठीं कांहींही करायचं नाहीं!" अर्जुन आवेशानें बोलत होता.

" तुझ्या जातीसाठीं – अस्पृश्यांच्या उद्धारासाठीं तूं कार्य करायला तयार झाला आहेस हें पाहून अर्जुन, मला आनंद वाटतो. पण त्यासाठीं इतर जातींचा द्वेष करण्याची कांहीं जरूर नाहीं — सुडाची भावना बाळगायला नको —"

" पटत नाहीं बाबा, तुमचं हें म्हणणं मला! आमच्या जातीला तुम्ही पांढरपेशे लोकांनीं आजवर इतक्या अन्यायानं वागवलं आहे – इतक्या खोल खड्ड्यांत दाट चिखलांत – नेऊन ठेवलं आहे कीं, नरकांतल्या किड्यांचीच याला उपमा द्यावी लागेल. पांढरपेशांना जिथं जिथं म्हणून ठेचतां येईल तिथं तिथं त्यांना ठेंचले पाहिजेत असं माझं ठाम मत झालं आहे. चुकलंच तें आमचं. ज्या ज्या वेळीं संधि मिळाली तेव्हां आमच्या लोकांनीं माघार घेतली आहे. पांढरपेशांविरुद्ध अस्पृश्यांनीं बंड केलीं पाहिजे होतीं—उघड उघड अत्याचार केले पाहिजे होते. गझनीच्या महमुदानं जितक्या क्रौर्यानं आमचीं देवालय लुटलीं, देवांच्या मूर्ति फोडल्या नि भटाब्राह्मणांचीं मुंडकीं छाटून टाकलीं; तितक्याच क्रौर्यानं पांढरपेशांचा आम्हीं निकाल लावायला पाहिजे होता. पण धर्म आडवा आला ना! जिथं तिथं धर्मानं घाण केली. धार्मिक बंधनांची पकड मनावर बसल्यामुळं

जेव्हां तेव्हां माघार घेतली—सुडाची भावना कधींच बेफाम होऊं दिली नाहीं. म्हणून आज हजारों वर्षें तुमचे पांढरपेशांचे गुलाम होऊन राहिलों आहोंत. ब्राह्मणेतरांनीं मध्यें जोर केला होता, पण त्यांचीही नांगी मोडली. तेही कधीं असे बेफाम झाले नाहींत. त्यांनासुद्धां पांढरपेशेच व्हायचं होतं ना ? म्हणून त्यांची नांगी मोडली—सरकारनें दिलेल्या भाकरीच्या तुकड्याने चार अधिकाराच्या जागा मिळतांच त्यांना कृतकृत्य वाटलं—पांढरपेशे झालों असं त्यांना वाटलं. त्या वेळीं त्यांनीं अस्पृश्यांना जवळ केलं असतं तर आज चोंहोंकडे समता दिसून आली असती—दोघांनीं मिळून पांढरपेशांचा धुव्वा उडवून दिला असता. पण नाहीं. ते तरी कुठं आम्हाला जवळ करीत होते, अन् आतां करताहेत ? ब्राह्मणांविरुद्ध बोटं मोडणारा मराठा, ब्राह्मण मराठ्याला ज्या पद्धतीनं वागवतो त्याच पद्धतीनं महाराला वागवितो—त्यांचा स्वार्थ आडवा आला नी सगळं वाटोळं झालं—"

महादेवांनीं अर्जुनाला बोलण्यांत विक्षेप केला नाहीं. त्यांनीं त्याला अंतःकरण-पूर्वक बोलूं दिलें.

अर्जुनाचा काळासांवळा चेहरा सात्विक संतापानें तांबुस झाला होता. त्याच्या डोळ्यांत त्वेष झळाळत होता. त्याच्या कपाळावरील शिरा फुगून उडत होत्या. घामानें त्याचें अंग चिंब होऊन गेलें होतें.

" तुझं म्हणणं खरं आहे अर्जुन. पांढरपेशांनीं तुम्हांला अंधारांत ठेवलं—कायमच्या गुलामगिरींत ठेवलं हें खरं आहे. पण म्हणून परस्परांनीं एकमेकांच्या नरडीचा घोंट घ्यायला का उठायचं ? आज अखिल हिंदुस्थानला नाहीं का गुलामगिरींत ठेवलेलं ? म्हणून का कुणी सरकारच्या नरडीचा घोंट घ्यायला जातं ? योग्य मार्गांनीं कांटा काढला पाहिजे—कांटा लवकर निघावा म्हणून पायच कापून कसं चालेल ? हळुहळू या गोष्टी नाहींशा होतील. गांधीजींचे प्रयत्न यशस्वी झाले तर कालान्तरानं अस्पृश्यता इतिहासजमा होईल—"

" हें कालान्तर खूप झालं आतां. जगाच्या अंतापर्यंत संपायचं नाहीं तें. अन् गांधींनीं असं काय मोठंसं केलं आहे ? मंदिर प्रवेशाच कीं नाहीं ? तीं मंदिरं नि ते प्रवेश लखलाभ होवोत तुम्हाला—आम्हाला देव नकोत. माणसांप्रमाणं वागवा, हें आम्हाला पाहिजे. आम्हाला

सारे अधिकार पाहिजेत. तुमच्या जोडींत प्रत्येक ठिकाणीं स्थान पाहिजे आम्हाला–ब्राम्हणेतरांनीं अस्पृश्यांच्या जोडीनं जर पांढरपेशांवर चौंहीकडून सारखा हल्ला केला असता तर आज हे हक्क दोघांनाही मिळाले असते. सर्वत्र समता आली असती. सरकारबरोबर टक्कर द्यायला आज देशांत केवढं तरी बळ निर्माण झालं असतं. गांधींना म्हणावं, हें कार्य आधीं करा–मग पाहूं ब्रिटिश सरकार कसं स्वराज्य देत नाहीं तें ! तें कालान्तर नी हृदयपालट राहूंद्या–झटपट काय करतां तें बोला. वणवा लागून जसं माजलेलं जंगल क्षणांत खाक होतं तसं कांहीं तरी झालेलं आम्हाला हवं आहे ! ”

“ अर्जुन, तुझं तरुण रक्त सळसळत आहे म्हणून तूं असा तावातावानं बोलतो आहेस. अरे, हें कार्य का साधंसुधं आहे ? एक शाळा मला नीट चालवतांना नाकीं नऊ येत आहेत, तिथं झटपटीच्या गोष्टी कुठल्या ? तूं इथं राहा. तुझा अनुभव अन् इथली परिस्थिति यांचा मेळ घाल, नी जें कार्य करायचं तें इथं कर. खेड्यापाड्यांत कर.”

“ खेड्यापाड्यांत कांहीं व्हायचं नाहीं, बाबा. हें कार्य बाहेरूनच झालं तर होईल. मुळाचा विस्तार आतां खूप दूरवर गेला आहे. शहरांतून आमच्या चळवळी फोंफावल्या, कीं त्यांचा परिणाम खेड्यापाड्यांतही होईल. डोंगर-पायथ्यावरून मारलेल्या आरोळीचा डोंगराकडून प्रतिध्वनी आल्याशिवाय कसा राहील ? तुम्हीही आपलं कार्यक्षेत्र शहरांतच निवडायला पाहिजे होतं. आज खेड्यापाड्यांच्या नाड्या शहरांत आहेत. शहरांत फट् झालं तर त्याचा आवाज खेड्यांत तोफेसारखा होतो. तेव्हां जें काय करायचं तें शहरांतच केलं पाहिजे. तिथं जी गोष्ट पटवून द्यायला क्षणही लागत नाहीं तीच खेड्यांत जन्मभर पटत नाहीं. असं आहे हें ! ”

महादेवांना या वेळीं जगन्नाथाची आठवण झाली. जगन्नाथाचीं मतें अशींच कांहींशीं होतीं. ते मनांत म्हणाले–साऱ्या तरुणांचें रक्त एकाच जातीचं असतं का ? नाहीं तर दोघांच्या विचारांत एवढें साम्य कसें ?

त्यांना अर्जुनाचे विचार पटले नाहींत, तरी त्याचा तो बोलण्यांतील आवेश, त्याची कळकळ आणि अन्यायाची वाटत असणारी चीड यांचें त्यांना कौतुक वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

" आतां तूं आहेसच कांहीं दिवस इथें. करूं विचार तुझ्या म्हणण्याचा. बरं. चहा घेणार आहेस का ? घेऊं थोडा थोडा ! भागी, ए भागी, दोन कप चहा तयार करून आण. तुला कळलंच असेल भागी इथें आल्याचं, अन् कां तेंही ? नाहीं ? मग सांगतों ऐक ! "

या वेळीं भागीनें खिडकींतून डोकावून पाहिलें आणि अर्जुनाला पाहून ती आंत निघून गेली.

महादेवांनीं हळुहळू सारी हकीकत त्याला सांगितली. ती ऐकून अर्जुन म्हणाला, " मी म्हणतों तें हेंच. इथंच सारं चुकतं. कां भागी देऊन टाकली नाहीं भगवानाला ? काय भगवान नालायक आहे, लुळापांगळा आहे ? लाथ मारील तिथें पाणी काढण्याची धमक आहे अंगांत त्याच्या. भागी त्याची बायको झाली असती तर केवढे अनर्थ टळले असते ! अशानं कसे आम्ही एकमेकांच्या जवळ येणार ? "

" अर्जुना, कसं शक्य आहे हें या गांवांत ? तूं न् मी एक सुधारलेल्या विचारांचे असलों म्हणून सारा गांव तसा होईल काय ? उद्यां तूं म्हणशील, भागी माझी बायको व्हायला काय हरकत आहे ? "

" मी तसं म्हणत नाहीं. पण विचारतों, काय हरकत आहे ? सांगा ना ? काय हरकत आहे ? मी महार असलों तरी माणूसच आहें ना ? पुरुषाचीच जात ना माझी ? भगवानापेक्षां तरी—कां ? इथल्या कुणाही भागीच्या जातीच्या तरुणापेक्षां मी कितीतरी पटीनं लायक आहें ! शंका वाटते तुम्हांला ? "

" छे ! छे ! शंका काय म्हणून तुझ्याबद्दल ? पण — " महादेव हंसत हंसत म्हणाले.

भागी चहाचे दोन कप घेऊन आली. अर्जुनाच्या दृष्टीला तिनें दृष्ट दिली नाहीं, तरी अर्जुनानें तिला पाहून घेतलें.

भागी पूर्वीपेक्षांही अधिक सुंदर दिसत होती. तिचें शरीर पूर्वीपेक्षां कृश दिसत होतें. अर्जुनाला मनांत वाटलें — भागी किती छान दिसते. काय हरकत आहे भागी माझी बायको व्हायला ? तो तिच्या चेहऱ्याकडे टक लावून पहात राहिला.

"घे, अर्जुन चहा घे!" भागीनें खालीं ठेवलेल्या कपाकडे पहात महादेव म्हणाले.

अर्जुनाला थोडा संकोच वाटल्याखेरीज राहिला नाहीं; पण त्यानें तसें दाखविलें नाहीं. आतां त्याला तशी संवयही झाली होती. मुंबईत तो वाटेल त्या हॉटेलांत जाऊन चहा पीत होता राजरोस. तरीही त्याच्या डोळ्यापुढे चहा पितांना पूर्वीचें दृश्य उभें राहिलेंच. गांवांत कुणी चहा दिला तर करवंटीमधून तो त्याला पूर्वी प्यावा लागत होता. हॉटेलांत महारांचा निराळा कप असे, त्यांतून चहा प्यावा लागे. आणि त्या कपांत चहा ओततांना अंगावर थेंब उडूं नये म्हणून हॉटेलचा मालक किती खबरदारी घेई! एकदां तर अंगावर थेंब उडाले म्हणून हॉटेलवाल्याला आंघोळ करावी लागली होती, आणि अर्जुनाला चहा पितांना दर घोंटागणीक शिव्याही गळीं उतराव्या लागत होत्या.

अर्जुन निघून गेल्यावर महादेवांनीं कागदपत्रांत पुनः डोकें खुपसलें. कलेक्टरला त्यांनीं केलेल्या अर्जांचीं तीं उत्तरें होतीं. एक अर्ज त्यांनीं भिकू सुताराचें प्रेत कोणत्या अडचणींत खासगी जागेंत जाळावें लागलें त्याबद्दल केला होता. त्या अर्जाच्या उत्तरांत कलेक्टरनें त्यांना खासगीरीत्या शाबासकी दिली होती आणि प्रकरण मामलेदाराकडे चौकशीसाठीं पाठविलें आहे असें लिहिलें होतें. दुसरा अर्ज शाळेसंबंधींचा होता. त्यांत सरकार शाळेच्या बाबतींत सर्वतोपरी मदत करील असें मोघम आश्वासन दिलें होतें. मात्र अशी अट घातली होती, कीं गांवांतील लोक निम्मा खर्च सोसायला तयार असले तर सरकार अवश्य विचार करील.

स्मशान प्रकरणाबद्दल फौजदारानें दाजिबाच्या आणि इतर कांहीं पंचांच्या सहाय्यानें मामलेदाराकडे अर्ज केला होता. महादेवांना या प्रकरणांत हटकून शिक्षा होणार अशी त्यांची खात्री होती. पण कलेक्टराच्या उत्तराच्या बातमीनें त्यांची निराशा झाली. फौजदार जागच्या जागीं अस्वस्थ होऊन बसला. त्याला उलट भीति वाटूं लागली, कीं न जाणो प्रकरण आपल्या अंगाशीं यायचें आणि आपली फौजदारी जायची. त्यामुळें तो वरकरणीं महादेवांशीं गोड गोड बोलूं लागला आणि शाळेची गोष्ट काढतांच आपण लोकांची समजूत करतों असेंही आश्वासन त्यानें दिलें.

---

## म्हाताऱ्याला जात नसते १८

माणसाचें मन पुष्कळ वेळां एकाच वेळीं दोन परस्पर विरोधी विचारांच्या आधीन होत असतें. एकच मन एकाच वेळीं त्याला दुहेरी सल्ला देत असतें. अशा वेळीं काय करावें हेंच त्याला सुचेनासें होतें. आणि अशा वेळीं एका कुठल्या तरी विचाराचा जय घेऊन त्याच्या नकळत तें त्याच्याकडून इष्ट कार्य करून घेत असतें.

सुरबा चाकरमानी भागीच्या वियोगानें जवळ जवळ वेडेपिसे झाले होते. भागी आपल्या जवळपास असूनही आपणांला भेटूं नये, ती आपल्या दृष्टीला पडूं नये याचें त्यांना फार दुःख होत होतें. तिला कदाचित् मृत्यू येता तर तें दुःख त्यांनीं सहन केलें असतें, पण ती जिवंत असूनही त्यांना नसल्यासारखी होणें क्लेशकारक होत होतें. एक मन त्यांना सांगे — जा जाऊन भेट भागीला. दुसरें मन सांगे — छे ! ती आतां तुला मेलीच. अब्रूपेक्षां मुलगी का जास्त समजायची ?

भागीला भेटून यायला त्यांना कोणीही बंदी केली नव्हती; तिला भेटून यायला कोणतीच हरकत नव्हती. त्याबद्दल कुणी फारशी टीकाही केली नसती. कुणी नांवेंही ठेविलीं नसतीं. पण त्यांचा स्वाभिमान आडवा येत होता — जगानें कांहीं म्हटलें नाहीं — तरी म्हणायला आधार होईल असें कांहीं साधन निर्माण होऊं देतां कामा नये याची ते खबरदारी घेत होते.

आणि म्हणूनच भागी बाळंतीण होऊन तिला मुलगा झाला हें कळूनही ते भेटीस गेले नाहींत. महादेवांनीं जेव्हां प्रथमच ती बातमी त्यांना जाऊन सांगितली, तेव्हां त्यांच्या डोळ्यांत विषादाच्या लहरी चमकल्या. ते कांहीं बोलले नाहींत. त्यांनीं गरीला किडा लावला आणि नदींत फेंकीत हिसका देत म्हटलें, "आज शिंचा एकही चांगलासा मासा मिळाला नाहीं."

"सुरबा, तुला भागीची कांहींच का रे दया येत नाहीं?"

"दया? हं! दयाबिया कांहीं जाणत नाहीं मी. आम्ही शिपाईगडी!" चाकरमान्यांनीं उत्तर दिलें. पण त्यांच्या डोळ्यांच्या बुबुळांनीं भरून उरलेली सारी जागा पाण्यानें भरून गेली होती आणि आतां ते वाहूं लागतात कीं काय असें वाटत होतें; तरीही ते लगेच पुढें म्हणाले, "भागी बिगी कांहीं जाणत नाहीं आपण!"

पण त्यांच्या आवाजांतला कंप महादेवांना जाणवल्यावांचून राहिला नाहीं. "माझं जगांत या कुत्र्याखेरीज कुणी नाहीं. कुत्रासुद्धां विचारणार नाहीं असं माझ्या बाबतींत तरी म्हणायला नको. चल ये रे नामदेव!" कुत्रा चाकरमान्यांच्या जवळ आला. त्याला पकडून त्यांनीं एवढ्या जोरानें हृदयाशीं धरून आवळलें, कीं वाटावें आपल्या अंतःकरणांतील सारें वात्सल्य ते कुत्र्यावर ओतीत आहेत.

हें काय महादेवांच्या अंतःकरणाला कळल्यावांचून राहिलें?

आणि तेव्हांपासून सुरबा अस्वस्थ झाले होते. त्यांना असा भास होऊं लागला, कीं कुणीतरी आपल्या अंतःकरणांत चाळवाचाळव करीत आहे, कुणीतरी आंतल्या आंत गुदगुल्या करीत आहे. आणि त्यापासून त्यांची अस्वस्थता सारखी वाढतच गेली.

आतांही ते असेच अस्वस्थ होऊन ओटीवर येरझारा घालीत होते. बाहेर उन्हें कडक पडलीं होतीं. त्यांच्या जिवाची आंतून आणि बाहेरून सारखी काहिली होत होती. मनांत विचारांचा सारखा झगडा चालला होता. विचार त्यांना इतके अनावर झाले, कीं काय करीत आहों याचेंही त्यांना भान राहिलें नाहीं. ते तसेंच उघडेबोडके बाहेर पडले आणि वाट चालूं लागले.

ते महादेव ठाकुरांच्या घराजवळ आले. ओटीवर गेल्यावर त्यांनीं मोठ्यानें हांक मारली,

" भागी, भागी ! "

ती परिचित हांक कानीं पडतांच भागी बाहेर धांवत आली. तिनें सुरबाला पाहिलें–ती रडूं लागली. तिला कांहींतरी बोलायचें होतें, पण तें तोंडावाटे उमटत नव्हतें.

तिच्या दोन्ही हातांत मूल होतें. तें आपल्या दोन्ही पायांची चाळवाचाळव करीत होतें. त्याच्या त्या चिमुकल्या हालचाली सुरबा मोठ्या कौतुकानें आणि अनिमिष नेत्रांनीं पहात राहिले. भागीबरोबर बोलायला पाहिजे याचें भानसुद्धां त्यांना राहिलें नाहीं.

भागीनें पाहिलें, आपला बाप मुलावर लोभसवाणी दृष्टी टाकून राहिला आहे. तिनें चटकन् आपले दोन्ही हात पुढें केले. सुरबांनाही कळलें नाहीं, आपण केव्हां दोन्ही हात पुढें केले तें.

सुरबांनीं मुलाला दोन्ही हातांत घेऊन आपल्या हृदयाशीं धरलें, आणि आवेगानें ते भागीला म्हणाले, " भागी, चल. आपल्या घरीं चल ! "

भागीचा चेहरा आनंदानें नुसता फुलून गेला. मोहोर आलेला आंबा जसा फुलून येतो–तसा तिचा चेहरा हर्षानें बहरला. ती म्हणाली, " पण, बाबा, काकांना विचारून नको का जायला ? "

" छे ! छे ! काकाबिका कुणी नको या वेळीं यायला. तो यायच्या आंत आपणाला इथून निघालं पाहिजे. चल. चल."

" मला आवरूं तरी दे ! "

" अंऽहं ! मागाहून काय असेल तें आवर. आधीं चल."

भागी लगेच घरांत जाऊन महादेवांच्या वहिनीला सांगून आली; आणि सुरबा लेकीनातवाला घेऊन रस्ता चालूं लागले.

मुलाला त्यांनीं खांद्यावर टाकला होता. तो चुळबुळ करी, तेव्हां ते त्याला आपल्या रांकट हातांनीं हळुहळू गोंजारीत.

वाटेंतील वडाच्या झाडाखालीं तीं आलीं तेव्हां महादेव समोरून येतांना त्यांनीं पाहिलें.

महादेवांनींही पाहिलें त्यांना.

दोघांचीही गांठ पडली तेथें. तेव्हां दोघेही क्षणभर थांबले.

पण कुणीच कुणाशीं बोलले नाहींत फारसे. महादेव म्हणाले, " एवढ्या उन्हांतून कशाला चाललास त्यांना घेऊन ! "

" नाहीं. ऊन तसं कांहीं फारसं नाहीं ! " सुरबांनीं उत्तर दिलें.

जसें कांहीं पूर्वी दोघांचें ठरलेंच होतें मुलाला घेऊन जाण्याबद्दल, अशासारखें त्यांचें बोलणें झालें.

दोघेही त्यानंतर थांबले नाहींत. सुरबा आणखी बोलणें न लांबवितां चालूं लागले, तेव्हां महादेवांनीं त्यांचा हेतू जाणला आणि तेही चालूं लागले. त्यांच्या चेहऱ्यावर स्मिताच्या रेषा उमटल्या.

भागीला मुलासकट सुरबांनीं आपल्या घरीं आणून ठेविलें याचा गांवांत लगेच बोभाटा झाला. सगळेजण आपापल्या परीनें चर्चा करूं लागले. फौजदाराने जातीबाहेर घालण्याची धमकी अप्रत्यक्षरीत्या देऊन पाहिली. तेव्हां सुरबांनीं उत्तर दिलें, " मला म्हाताऱ्याला आतां कशाला हवी जात ? कुणा महाराच्या हातचं सुद्धां पाणी प्यावं लागेल मरतांना. तेव्हां जातीचा अभिमान कशाला बाळगूं ? "

दाजिबा आणि फौजदार यांनीं खूप कारवाई करून पाहिली, पण कांहीं जुळलें नाहीं.

याच दरम्यान दाजिबा आपल्या कुळांना खंडाबद्दल तगादा लावूं लागला. मागील बाकी आणि चालू खंड द्या, नाहींतर जमिनी सोडा—अशा त्याने कुळांना नोटिसा लावल्या. ज्यांच्या जमिनी गहाण होत्या त्यांनाही त्यानें कळविलें, कीं गहाण सोडवा नाहीं तर जमिनींचा लिलांव करून टाकीन.

यामुळें गांवांतील सुतार आणि कांहीं गांवकर मंडळी बेचैन होऊन गेली. खंड देणें आणि गहाण सोडविणें हें त्यांना शक्य नव्हतें. ते आपापसांत चर्चा

करूं लागले. जमिनी गेल्या तर काय करायचें हा प्रश्न त्यांच्यापुढें येऊन उभा राहिला. महादेवांकडे हा प्रश्न न्यावा असें त्यांच्या मनांत आलें, पण भिकूच्या प्रेतदहनाच्या प्रकरणापासून ते महादेवांच्या पुढें जाण्यास संकोचत होते.

शेवटीं त्यांनीं असें ठरविलें कीं, काय वाटेल तें झालें तरी जमिनी कांहीं हातच्या सोडायच्या नाहींत; दुसऱ्या कुणाला खंडानें घ्यायला द्यायच्या नाहींत; कुणी केल्या तर शेतीची नासधूस करून टाकायची; वेळ प्रसंग पडला तर मार देण्यासही मागेंपुढें पाहायचें नाहीं.

दाजिबाच्या कानावर या गोष्टी गेल्या तेव्हां तो शेपटीवर पाय पडलेल्या सर्पासारखा फणाणूं लागला. त्याला फौजदारानें साथ दिली. लागल्यास पोलिसांचीही मदत घेऊं, पण यांना चांगलेच जिरवूं असा त्यानें सल्ला दिला.

दाजिबानें कुळांवर थकलेल्या बाकीसाठीं जप्ती आणण्याचें ठरविलें.

---

# चिंचेच्या झाडाला बांधलें १९

जगन्नाथ विलायतेहून मुंबईला येणार म्हणून तार आली तेव्हां त्याला भेटण्यासाठीं महादेव ठाकूर मुंबईला निघून गेले.

पावसाळ्याचे दिवस अगदीं जवळ आले म्हणून शेतकरी आपल्या जमिनीची मशागत करूं लागले. झाडेंझुडपें तोडून तीं खतासाठीं शेतांत जाळण्यांत येऊं लागलीं. सांचलेला उकीरडा आणि राख शेतांत घातली जाऊं लागली. कांहीं ठिकाणीं जमिनी नांगरून जमिनीची मशागत होऊं लागली.

चोहोंकडे पुनः नवचैतन्य दिसूं लागलें. अजून पाऊस पडूं लागला नव्हता. तरी आकाशांत ढग जमूं लागले होते. मधूनमधून केव्हांतरी अगदींच उकाडा झाला म्हणजे पावसाचे कांहीं थेंब पडूं लागले.

सुतार—गांवकर लोकही आपापल्या जमिनी कसूं लागले होते. दाजिबानें त्यांना शेतावर जाऊन तंबी दिली. जमिनी सोडण्याबद्दल त्यांना नोटिसा मिळाल्याच होत्या, तरीही ते जमिनी नांगरूं लागलेले—मेहनत करायला लागलेले पाहून दाजिबानें त्यांना समजावणी देण्याचा प्रयत्न केला.

" जमिनी तुम्हाला नांगरतां येणार नाहींत या वर्षी. मागील खंड बाकीसह द्या न् शेतांत उतरा."

" खंड कांहीं देऊं शकत नाहीं आम्ही. पोटालाच नाहीं मिळत न् खंड कसला तुझ्या बोडक्याचा देणार—बामणा ! "

" मग जमिनी खालीं करा माझ्या—"

" जमिनी खालीं करून खायचं काय आम्ही ?"

" तें मी काय सांगूं ? काय वाटेल तें खा, नाहीं तर खाऊंच नका कांहीं. तो प्रश्न माझा नाहीं. न् तुम्ही खंड नाहीं दिला तर आम्ही काय खाणार ?"

" खोटं कशाला बोलतोस, बामणा ? घरांत कणग्या न् तटे भरलेले आहेत. दोन वर्षं तरी पुरेल भात !"

" तें काय विक्रीचं आहे. तें खायचं नाहीं."

" हां. उद्यां आम्ही अडलों म्हणजे सवाई-दिढीच्या बोलीनं देण्यासाठीं ठेवलं असशील ! नाहीं ? सवाई-दिढीचं उत्पन्न खंडाच्या दुपटीनं तरी मिळत असेल तुला न् खंड थकला म्हणून पुनः ओरड. पोटाला नाहीं मिळत म्हणून कां बोंब मारतोस ? असं तुझं पोट तरी केवढं मोठं आहे ? काय राक्षस आहेस का कोण आहेस ? अगदीं कांहीं काम न करतां तूं असं दरसाल उत्पन्न काढतोस न् आम्हांला इतकं मरमर काम करूनही पोटाला मिळत नाहीं, नी वर खंड आहेच तुझा. नाहीं घेतलास खंड एकादं वरीस तर ?"

" नाहीं घेऊन कसं चालेल रे ? सरकार सारा आहेना ?"

" तो भर शिलकेंतून. नदींतलं पसाभर पाणी नाहींसं झालं म्हणून नदी थोडीच आटणार आहे !"

" तुमच्या तोंडाला कोण लागेल ? फार माजोरी झालांत तुम्ही. माझ्या जिवावर पोसतां न् मलाच दम देतां ? मी म्हणून सहन करतों हें ! उद्यां सरकारी अधिकारी आला तर त्याला अशीं उत्तरं दिल्यास हातांत बिड्या घालून नेईल. तें कांहीं नाहीं—आधीं खंड द्या न् मग शेतांत उतरा. नाहींपेक्षां माझ्याशीं गांठ आहे."

" तुला खंडही नाहीं मिळायचा न् शेतही नाहीं मिळायचं—जा. थांबत असलास तर पुढच्या वर्षीं पाहूं. आम्ही शेत पिकवतों, शेत आमचं आहे !"

" मग मला सरकारी अधिकारी आणावा लागेल —"

" तूं अन् तो सरकारी अधिकारी गेलां —"

दाजिबानें पाहिलें, त्यांच्याबरोबर जास्त बोलण्यांत अर्थ नाहीं. बोलण्यांत ते कुणालाच हार जायचे नाहींत. उलट जास्त बोलायला जावें तर आपलीच शोभा व्हायची. तरीही तो जातां जातां म्हणालाच, " त्या म्हाद्या ठाकरानं तुम्हांला शेफारून ठेवलं आहे. पण माझ्याशीं गमजा चालायच्या नाहींत. उद्यां जप्तीचा हुकूम आणतों पहा — "

सुतार मनांतून घाबरले यांत शंकाच नाहीं. सरकारी हुकूम येऊन जप्ती आली तर काय करायचें हा त्यांच्यापुढं प्रश्न होता. घरदार जप्त करून नेलें तर करायचें काय, हें त्यांना सुचत नव्हतें.

दाजिबा गेल्यावर ते तेथेंच शेतावर गोळा झाले. तेथें नसलेल्यांना आणि कांहीं गांवकर कुळांना त्यांनीं बोलावून आणलें आणि पुढें काय करायचें याचा विचार चालविला. या पूर्वी ते असे कधींच एकत्र आले नव्हते. प्रत्येकाला स्वतःपुरतीच काळजी वाटत होती; तो दुसऱ्याची चिंता करीत नव्हता. पण आतां संकट सर्वांवरच येऊन ठेपलें होतें त्यामुळें ते सारे आपोआप एकत्र गोळा झाले.

त्यांच्यांतला एक वयानें मोठा असा शेतकरी म्हणाला, " उद्यां जर घरावर जप्ती आली न् शेतांत कसवणूक करण्याची मनाई झाली तर करायचं काय ? कोण आम्हाला आयत्या वेळीं पैसे आणून देणार ? "

" कुणाचं तरी कर्ज काढावं ! "

" पण कर्ज कोण देणार आपल्याला ? अन् एकट्या दुकट्याचा प्रश्न का आहे ? न् कर्ज काढायचं कशाच्या जोरावर ? फेडायचं कसं तें उद्यां ! "

" महादेव ठाकराकडून कर्ज घ्यावं ? "

" पण तो देईल एवढं कर्ज आम्हाला ? तो आम्हाला काय म्हणून देईल ? त्याची शाळा ओस पाडली, दहिंकाल्यांत त्याला मार मिळाला न् भिकूचं प्रेत आम्हीं कुजवलं. कां करावी त्यानं मदत आम्हाला ? "

" मग करायचं काय ? "

" करायचं काय ? मरायचं किंवा मारायचं ! "

" कुणाला मारायचं ? मारून काय मिळणार आहे ? "

" मिळेल किंवा मिळणारही नाहीं. पण उगी स्वस्थ बसून राहाण्यापेक्षां कांहींतरी केलं पाहिजे."

" जमिनी ओस पाडल्या तर ? "

" दुसरे आहेतच टपून बसलेले. त्यांना कशी बंदी करणार ? त्यापेक्षां जमिनी हातच्या जाऊं द्यायच्या नाहींत. कुणाचा त्यासाठीं बळी पडला तरी चालेल—फांशीं जावें लागलें तरी हरकत नाहीं—पण एकदां दहशत बसेल चांगली. पुनः कुणी वाटेला जाणार नाहीं. आहे तयारी ? "

कुणीच कांहीं बोललें नाहीं. तेव्हां तो शेतकरी रागानें म्हणाला, " ज्यांची तयारी नसेल त्यांनीं इथून निघून जावं. त्यांच्यासाठीं मरायला बाकीचे तयार आहेत. त्यांनीं एवढं तरी करावं, आमच्या मार्गांत त्यांनीं आडवें येऊं नये. चला जा ! "

*   *   *   *

दाजिबाची थांबण्याची मुळींच तयारी नव्हती. तीनचार वर्षांचा खंड बाकी ठेवून देण्याला तो मुळींच कबूल नव्हता. सामोपचाराचा मार्ग फुकट गेला, आतां सरकारी मदत घ्यायची असें त्यानें ठरविलें. त्याला चीड आली होती ती वर आणखी कुळें आपला उपमर्द करतात त्याची. तो रागाच्या भरांत सरळ तालुक्याच्या ठिकाणीं कोर्टांत फिर्याद दाखल करायला गेला. लगेच शेतकऱ्यांना समन्सें लागलीं. पण कुणीच कोर्टांत गेले नाहींत.

आणि मोठा पाऊस पडणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. मधून मधून कांहीं सरी पडूंही लागल्या. शेतकऱ्यांनीं आपल्या जमिनी नांगरण्यास सुरवात केली. वनगांवांत सगळीकडे गजबजाट होऊन गेला.

आणि एके दिवशीं सकाळीं दाजिबा कोर्टाच्या जप्तीदाराला घेऊन गांवांत येऊन दाखल झाला. फौजदारालाही त्यानें आपल्याबरोबर घेतलें.

त्या वेळीं शेतकरी शेतांत कामें करीत होते. सुतारवाड्यांत एका सुताराच्या घरावर त्यांनीं पहिली जप्ती आणली.

तो भगवानाचा मामेभाऊ होता. जप्तीदार येतांच त्यानें खंडाची मागणी केली. भगवानाचा मामेभाऊ सदाशिव म्हणाला, " खंड आज देतां येत नाहीं. पुढच्या वर्षी देतों." तेव्हां सरकारी माणसें घरांत शिरलीं.

सरकारी माणसें घरांत शिरलीं तेव्हां भगवानाच्या मामीनें एकच आरडा-ओरडा केला. ती मोठमोठ्यानें रडूं लागली.

सदाशिवाच्या घरांतील एकएक जिन्नस बाहेर निघूं लागले.

खेड्यांतल्या माणसाच्या घरांत सामान तें काय असायचें ? एकदोन धातूचे तांबे आणि कळशी घागर; एकदोन ताटल्या वाट्या. बाकी मातीचीं भांडीं. पण सरकारी माणसें मातीचीं भांडीं आणि धातूचीं भांडीं यांत भेद मानीत नसतात. त्यांना भांडीं दिसलीं कीं तीं बाहेर काढायचीं एवढेंच माहित. मातीचीं भांडींही बाहेर आलेलीं पाहून म्हातारी संतापली. तिनें शिव्यांची लाखोली वाहायला सुरवात केली.

दाजिबाची नजर नंतर भाताच्या तीन मुड्या आणि एक कणगी यांजवर गेली. " सदाशिव, हें भात घरांत आहे तुझ्या न् नाहीं म्हणतोस ! खंड तेवढा द्यायला नको काय ? "

" मेल्या चांडाला, तुला देऊन खावं काय आम्ही ? " म्हातारी कडाडली.

" चला. घाला हात त्या कणगीला ! " दाजिबा ओरडला.

कणगीला हात घालायला माणसें गेलीं तेव्हां एवढा वेळ खांबासारखा तटस्थ उभा राहिलेला सदाशिव पुढें झाला आणि त्यानें कणगीला आपल्या बाहूंचा विळखा घातला. ती कणगी हातची सोडणें त्याच्या जिवावर आलें. त्या कणगीवर त्याचा सारा जीव होता. पावसाळी पीक हातीं यायचें तिच्या-वरच अवलंबून होतें. त्यांत त्याचें पेरणीचें बीं भरून ठेविलेलें होतें. पुढील वर्षाची पोटगी त्यांतून निर्माण व्हायची होती.

सदाशिवनें कणगी अगदीं घट्ट पकडून ठेवली. त्याला बाजूला खेंचण्याचा प्रयत्न झाला. पण तो केंसभरही बाजूला हटला नाहीं. तेव्हां दाजिबानें आपल्या हातच्या काठीनें त्याच्या हातावर घाव घातला.

" मी जिवंत असेपर्यंत तरी कणगी तुमच्या हातीं लागूं देणार नाहीं." सदाशिव निश्चयानें म्हणाला. त्यानें दाजिबाच्या काठीचा तडाखा संयमानें सोसला.

एकाएकीं तेथें भगवान येऊन उपस्थित झाला. भिकूच्या मृत्यूपासून त्यानें आपल्या मामाच्या घराचा उंबरठा ओलांडला नव्हता. पण आतां त्याला राहवलें नाहीं. तो मनांतला मामेभावावरचा राग विसरून गेला आणि धांवत तेथें आला.

दाजिबानें काठीचा तडाखा मारला त्यासरशी त्याचें देहभान सुटत चाललें होतें.

आणि पुनः जेव्हां दाजिबानें काठी उगारली तेव्हां त्यानें दाजिबाचा हात पकडला.

दाजिबानें रागानें भगवानाकडे वळून पाहिलें.

" भगवान, सरकारी कामांत अडथळा नको आणूंस. हातांत बिड्या पडतील."

" काठीनं मारणं हें सरकारी काम वाटतं ? तूं रे कोण ? सरकारी कामदार केव्हांपासून झालास ? बिड्या माझ्या हातीं नाहीं पडायच्या, तुझ्या पडतील. सरकारनं काय मारायला तुला अधिकार दिलाय् ? " भगवानानें त्याचा हात पिरगाळीत विचारलें.

दाजिबा चिडला. भगवानाच्या अंगावर तुटून धांवला. भगवानानें त्याला लाथेच्या एका ठोकरीनें कोपऱ्यांत उडविलें.

जप्तीची वार्ता इतक्यांत शेतावर जाऊन पोंचली होती. बातमी समजतांच सर्वांनीं हातांतला नांगर सोडून तेथेंच ठेवला. बैलांना सोडून झाडाला बांधून ठेवलें आणि एकमेकांना कुकारे घालूं लागले. पांच मिनिटें सारी खालवट कुकाऱ्यांच्या निनादानें घुमत होती.

वीसपंचवीस जवान सुतारवाड्याकडे धांवले.

जतीदारानें आपल्या माणसांना सदाशिवाला बाजूला खेंचण्यास सांगितलें. भगवान त्यांच्यावर तुटून पडला. त्यानें कोपऱ्यांतल्या काठीनें त्यांना मागें हटविलें. तेव्हां जतीदार पुढें होऊन म्हणाला, " तुरुंगांत जावं लागेल, माहिती आहे ? "

सदाशिवची आई इतक्यांत आंतून धांवत आली, आणि तिनें आपल्या हातांतील पूड जतीदाराच्या डोळ्यांत फेंकली.

ती मिरचीची पूड होती. पूड डोळ्यांत जातांच जतीदार दाजिबाला हांका मारीत सैरावैरां धांवूं लागला.

इतक्यांत शेतावरचीं माणसें येऊन दाखल झालीं. तीं जोरानें आंत घुसलीं आणि मिळेल त्याला बडवूं लागलीं. सर्वांची पांगापांग झाली.

" कुठें आहे तो दाजिबा ? "

सगळेजण त्याला शोधूं लागले.

पण दाजिबानें केव्हांच पलायन केलें होतें.

जेव्हां म्हातारी मिरचीची पूड घेऊन फेंकायला आली तेव्हांच, प्रसंग कठीण आहे असें जाणून त्यानें सूंबाल्या केला होता.

दाजिबा पळून गेलेला पहातांच शेतावरचे लोक त्याचा पाठलाग करण्यासाठीं चारी दिशांनीं बाहेर पडले.

दाजिबा पळत होता. आपला पाठलाग होतो आहे हें त्याला कळून येतांच त्याचें धाबें दणाणून गेलें. तो सारखा पळूं लागला. त्यानें मनाशीं विचार केला—आज गांवांत राहिलों तर आपली कांहीं धडगत नाहीं. नदीपैलाडी जाऊन कुठेंतरी आश्रय घेतला पाहिजे. तो नदीच्या अनुरोधानें पळूं लागला.

महादेव ठाकूर नुकतेच मुंबईहून आले होते. जगन्नाथाला त्यांनीं बरोबर आणला होता. घरीं आल्याबरोबर त्यांना जतीची हकीकत समजली. लगेच ते बाहेर पडले.

ते रस्त्यावर आले तेव्हां दाजिबा जीव घेऊन पळत होता. त्यांनीं त्याला हांक मारली, पण उत्तर देण्याच्या स्थितींत दाजिबा थोडाच होता ! त्यानें महादेवांकडे ढुंकूनही पाहिलें नाहीं. तो सारखा पळत होता.

महादेवांना त्यामुळें हुरहूर वाटूं लागली. दाजिबा पळतो आहे त्या अर्थी त्याचा जीव धोक्यांत आहे असें त्यांना निश्चयपूर्वक वाटलें. ते घाईघाईनें सुतारवाड्याकडे निघाले.

पण जरासे चालून जातात न जातात तों त्यांना सातआठ जणांचें टोळकें धांवत येत असल्याचें दिसलें.

त्यांनीं मनांत जाणलें—नक्की ते दाजिबाचा पाठलाग करीत असले पाहिजेत. आणि जर दाजिबा त्यांच्या हातांत सांपडला तर ? तर ? तर ?—

त्या कल्पनेनें त्यांचें अंतःकरण व्याकूळ झालें. त्यांनीं मनाशीं कांहीं निश्चय केला आणि ते पाठलाग करणारांच्या मार्गांत आडवे आले.

त्यांनीं एकादोघांना घट्ट धरून ठेविलें आणि विचारलें. " हा काय अविचार मांडला आहे तुम्ही ? असलं भलतंच कांहीं करूं नका. थांबा, थांबा ! " पण त्यांचें ऐकून घ्यायला कोण तयार होतें ? दोघेतिघे पुढें गेले, आणि बाकीचे क्षणभर थांबून त्यांना म्हणाले, " ठाकूर, बाजूला व्हा. या वेळीं आम्ही आमच्या मार्गांत आडवा येईल त्याची गय करणार नाहीं. तुम्ही आपले स्वस्थ बसा घरीं ! "

" अरे पण—अरे पण— "

" अरे पण कांहीं नाहीं. " एकजण म्हणाला. " भगवान, या थेरड्याला बांधून ठेव रे त्या झाडाला. चला. पळा. याच बाजूनें दाजिबा गेला आहे ! " असें म्हणून ते धांवत सुटले.

भगवानानें महादेवांना आपल्या दणकट हातांनीं पकडलें आणि आपल्या कंबरेचें उपरणें काढून त्यांना चिंचेच्या झाडाला गच्च बांधून ठेवलें. " ठाकूर, जास्त गडबड करूं नका ! " असें म्हणून भगवानही आपल्या सोबत्यांच्या मागून धांवूं लागला.

---

# पूर आला २०

सुरबा चाकरमानी या वेळीं नदीकाठीं मासे गरवित बसले होते. नदीचें पाणी चिखलानें गढूळ झालें होतें. कुठेंतरी पाऊस लागला होता आणि त्यामुळें पाण्याचा प्रवाह जोसांत होता. पाणी गढूळ असल्यामुळें मासे मारण्याला सोपें जात होतें. सुरबांना खूप खूप मासे मिळत होते.

त्यांच्या शेजारीं बसून काळू महार त्यांची शिकार पहात होता. आज ते दोघे दोस्त झाले होते. सुरबा त्याला सांगत होते, कीं तुला हवे तेवढे मासे यांतून घेऊन जा. आणि काळू म्हणत होता—मासे नेऊन मी काय करूं ? माझा धनी भट—मासे न खाणारा. घरीं जाऊन जाईकडे देण्याएवढा वेळ कुणाला आहे ! हीं गुरें अशीं अवखळ. जरा मी नजरेआड झालों तर दाही-दिशांना पसरतील नि भट मला नाहीं नाहीं तें बोलेल.

त्यावर सुरबा त्याला म्हणाले, " गुरांचं काय घेऊन बसला आहेस ? गुरं मी पाहातों; जा, धांवत जा न् पळत ये ! "

" शाबास, मग झालंच. तुमचं लक्ष एकदां का या गरवण्यांत गुंतलं, कीं कुणी मासे चोरून नेले तरी तुम्हाला कळायचं नाहीं. मग गुरांची काय कथा ? " काळू हंसत हंसत म्हणाला.

" अगदीं अनुभवाचीच गोष्ट सांगतो आहेस, नाहीं रे काळ्या ?" गरीला काडू लावित चाकरमान्यांनीं विचारलें.

त्यावर काळ्या खदखदां हंसला.

" बाकी चाकरमानी, मासे मारावे तुम्हीच हां ! "

चाकरमान्यांना मोठा अभिमान वाटला.

" माझी गरी आहेच तशी ! "

" गरी नाहीं, जाळें ! "

" जाळें ? जाळें रे कुठलें ? माझं नाहीं बुवा जाळं ! "

" आहे तर. रागावणार नाहींत तुम्ही तर सांगतों. सांगूं ? "

" हं ! "

" तुमच्या दाढीमिशांचं जाळं. गांवचे लोक म्हणतात, तुमच्या दाढीमिशांचं प्रतिबिंब पाण्यांत पडतं न् त्या जाळ्यांत मासे आपोआप अडकतात ! "

काळ्या पोट धरून हंसूं लागला.

" हट् गाढवीच्या. लोक काय रिकामटेकडे आहेत. ते काय वाटेल तें बोलतील. असं बोलायचं नाहीं पुनः—" असें रागाचा आविर्भाव आणून चाकरमानी म्हणाले, आणि आपणही खदखदां हांसूं लागले.

" चाकरमानी, असं केलं तर ? "

" काय रे ? "

" आज बाबांचा मुलगा विलायतेहून आला म्हणतां ना ? मग त्यालाच चांगले ताजे मासे नेऊन दिले तर ? "

" हां ! हां ! बरी आठवण केलीस. ऊठ तर, पळत जा न् सांग चाकरमान्यांनीं भेट पाठविली आहे म्हणून ! "

काळूनें घोंगडींत ताजे मासे भरले आणि तो पळत जायला निघाला.

वाटेंत दाजिबा घामाघूम होऊन धूम ठोकीत पळत येत असलेला काळूनें पाहिला. त्याला त्यानें बाजूला होऊन वाट दिली.

दाजिबा धांवत पुढें गेला. आणि थोड्या वेळानें पाठलाग करणारी मंडळीही त्याला दिसली.

काळू तसाच पुढें चालूं लागला. महादेव ठाकुरांच्या घराजवळ जातांना वाटेंत लागणाऱ्या चिंचेला कुणाला तरी बांधून ठेविलें आहे असें दुरून काळूला दिसलें. आणि त्याला असेंही लगेंच कळून आलें, कीं झाडाला बांधलेली व्यक्ति दुसरी कोणी नसून महादेव ठाकूरच आहेत.

ती जाणीव होतांच गाईच्या वासरासारखा काळू उड्या मारीत धांवला.

तो जेव्हां चिंचेजवळ आला तेव्हां महादेव ठाकूर हतबुद्ध होऊन राहिलेले त्याला दिसले. तो त्यांच्या जवळ जाऊन त्यांना विचारूं लागला, "बाबा, बाबा, कुणी हो तुम्हाला असं बांधलं ?"

महादेव गलित झाले होते. त्यांच्या साऱ्या शक्ति त्यांना सोडून गेल्या होत्या. एखादें बोचकें खुंटीवर अडकवून ठेवावें तशागत ते राहिले होते.

त्यांनीं डोळे उघडून पाहिलें, बोलण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, पण घशाला कोरड लागली होती.

काळूनें त्यांना क्षणांत मुक्त केलें.

महादेव खालीं बसले. चिंचेच्या खोडाला डोकें टेकून राहिले. त्यांना फार थकवा आला होता.

* * * *

दाजिबाला लोकांनीं दोन्ही बाजूंनीं घेरलें. नदीच्या कांठावर तो अडकला गेला. त्यानें पुढें पाहिलें—चारपांचजण हातांत कुऱ्हाडी कोयते घेऊन येत आहेत—त्यानें मागें वळून पाहिलें—मागें चारपांचजण कुदळी फावडीं घेऊन धांवत येत आहेत. पळायला कुठेंच वाट राहिली नाहीं. नदींत उडी टाकून पोहून जाण्याखेरीज दुसरा मार्गच दिसत नव्हता.

त्याचे पाय लटलटां कापूं लागले. त्याला पोहायला चांगलेंसें येत नव्हतें. पण जगण्याचा तोच एक मार्ग उरला होता. क्षणांत ते यमाचे दूत आपल्या देहाचे तुकडे तुकडे करून टाकतील असें त्याला वाटलें.

आणि जिवाच्या आकांतानें त्यानें अखेर नदींत उडी घेतली.

त्यानें उडी घेतांच केवढ्यानें तरी मोठा धप्प् असा आवाज झाला. त्यासरशी सुरबा चाकरमान्यांनीं तिकडे वळून पाहिलें.

नदीचा प्रवाह जोरानें वाहात होता. कुठें तरी नुकताच मोठा पाऊस लागला होता आणि त्यामुळें नदीला मोठा लोंढा आला होता असें दिसत होतें.

थोड्या वेळानें बुडालेला दाजिबा वर आला. पाण्याच्या पृष्ठभागावर त्याच्या डोकीचा भाग दिसला. सुरबांना वाटलें — कुणी तरी माणूस बुडून मरत आहे.

त्यांनीं लगेच अंगांतील कपडे काढायला सुरवात केली.

इतक्यांत दोन्ही बाजूंचे लोक तेथें येऊन पोंचले होते. ते दाजिबाकडे नदींत पाहात ओरडले, " मर साल्या बुडून ! "

" कोण आहे रे ? कुणाला मर म्हणतां ? " सुरबांनीं विचारलें.

" दाजिबा—"

" काय दाजिबा ? न् तुम्ही त्याला मरूं देणार ? हट् लेकांनो ! मी काढतों वर त्याला. मरतांना शत्रू मित्र सगळे सारखे—" सुरबा नदींत उडी घेण्याच्या पावित्र्यांत उभे राहिले.

पण त्यांना आढळून आलें, कीं सर्वांनीं आपणास पकडून ठेविलें आहे.

त्यांनीं नदींत पाहिलें—दाजिबाची हालचाल कुठेंच दिसून येत नव्हती.

आणि नदीचा प्रवाह मात्र वेगांत पुढें पुढें जात होता.

* * * *

सगळ्या गांवांत चोहोंकडे बातमी पसरली—कीं दाजिबानें भरल्या नदींत उडी घेतली—दाजिबा नदींत वाहून गेला. या प्रकारानें महादेव ठाकूर अगदीं हताश होऊन गेले. ते जगन्नाथाला म्हणाले, " आतां यांतून काय निर्माण होईल तें सांगतां येत नाहीं. एक दाजिबा गेला, पण पांचपंचवीस कुटुंबें धुळीला मिळतील—"

" पण एक होईल. पांचपंचवीस कुटुंबें जरी धुळीला मिळालीं तरी यापुढें दाजिबासारख्या जमीनदारांना दहशत बसेल. ते आपल्या कुळांशीं — शेतकऱ्यांशीं नीट वागतील ! " जगन्नाथ म्हणाला.

" कुणीं सांगावं ? कदाचित् याचा उलटही परिणाम होईल. शेतकऱ्यांचा अधिक छळ होईल—"

" अधिक छळ झाला तर जमीनदारांना थोडक्याच अवधींत नामशेष व्हावं लागेल—पांचदहा वर्षें छळ होईल खरा, पण त्यानंतर जमीनदारांचे हाल कुत्रा देखील खाणार नाहीं. भुकेलेले लोक काय करतील तें सांगतां येणार नाहीं. मांजर गरीब असलं तरी त्याच्या प्राणावर आलं, कीं तें उलट अंगावर आल्यावांचून राहात नाहीं— "

" जगन्नाथ, म्हणूनच म्हणतों—हे तंटे गोडीगुलाबीनं मिटविले पाहिजेत. आमच्या सारख्या ग्रामसेवकांनीं तडजोड घडवून आणली पाहिजे—"

" इथें तडजोड अशक्य आहे. जोंवर जमिनीमधून पिक काढणारा शेतकरी जमिनीचा मालक नाहीं, तोंवर हें असंच चालायचं. मालक नि कुळं असा संबंध जोंवर आहे तोंवर मालकाची स्वार्थाची आशा सुटणं शक्यच नाहीं—मग तडजोड कशी होणार ? तडजोड केव्हां होते ? जेव्हां स्वार्थत्याग करायला दोन्ही पक्ष तयार होतात तेव्हां. ग्रामसेवकांनीं हें कार्य व्हायचं नाहीं. त्याला सत्ताच हातीं पाहिजे."

" नुसत्या सत्तेनं काय होणार आहे ? कोणतीही गोष्ट पटवून दिल्यानं जेवढं मतान्तर होतं तेवढं सत्तेनं होऊं शकत नाहीं. ज्यांच्या हातांत सत्ता असते त्यांनीं आजवर काय केलं आहे ? उलट लोकमत बनविण्याचं कार्य बिनसत्ताधाऱ्यांनींच केलं आहे !" महादेव म्हणाले.

" लोकमत बनविण्याचं कार्य बिनसत्ताधाऱ्यांनीं केलं आहे, ही गोष्ट कुणीही कबूल करील. अन् त्या दृष्टीनं खेड्यापाड्यांत कार्य करणारांनीं हें लोकमत बनविण्याचं कार्य करीतच राहिलं पाहिजे. पण त्यांच्या प्रयत्नांना किती—मुंगीच्या पावलांनीं यश येईल ! यश येणार नाहीं असं मी म्हणत नाहीं, पण तें किती अल्प, नि धीरे धीरे !"

" आम्हांला मुळींच घाई करायची नाहीं. हळुहळू यश आलं तरी तें आम्हाला चालेल, पण जें यश येईल तें टिकाऊ असेल—जें मतान्तर होईल तें कायमचं —" महादेव म्हणाले.

" पण अशा धीरे धीरे प्रकारांनीं रोजच्या गरजा नि त्यांतून निर्माण होणारे प्रश्न यांची वाट लागणार नाहीं; ते तुमच्यासाठीं वाट पाहाणार नाहींत. उलट त्यांच्यामुळें परिस्थिति दिवसेंदिवस बिकट होत जाईल. ती तशी बिकट होऊं नये म्हणून त्यांचा झटपट निकाल लावला पाहिजे—त्यासाठीं आपल्या हातीं देशाच्या राज्यकारभाराची सत्ता अनिर्बंधित आली पाहिजे—रशियांत ही सत्ता लोकांच्या हातीं येतांच त्यांनीं ताबडतोब आपणाला हव्या त्या सुधारणा करून टाकल्या. खेडयांत ग्रामसुधारक पाठवून धीरे धीरे कार्य करीत बसले नाहींत."

" राज्यसत्ता अशी काय एकदम हातीं येते ? "

" त्यासाठीं झगडलं पाहिजे. देशांतल्या साऱ्या चळवळी बंद ठेवून आधीं राजकीय स्वातंत्र्यासाठीं झगडलं पाहिजे."

" मग काय आमच्यासारख्यांनीं हा उद्योग बंद ठेवून स्वस्थ बसावं ? खेडयापाडयांतील सुधारणांनीं राज्यसत्ता हातीं येईपर्यंत वाट पहावी—" महादेवांनीं प्रश्न केला.

" बाबा, तुमच्यासारखीं जीं माणसं आहेत त्यांनीं खुशाल असलीं कार्यें करीत बसावं. त्यांच्या कार्याला झटपट यश मिळत नाहीं म्हणून तें सर्वस्वीं त्याज्य आहे असें मी मुळींच म्हणणार नाहीं. त्यांनीं खेडीं सुधारण्याचे आपापल्या परीने प्रयत्न चालू ठेवावे. लोकांना साक्षर करून सोडावं, त्यांना स्वावलंबी होण्यास शिकवावं. पण राष्ट्रोद्धाराचे हेच मार्ग आहेत अशी समजूत करून घेऊं नये. खेडीं सुधारलीं कीं देश सुधारला हें खरं असलं तरी खेडीं अशा मार्गांनीं कधीं सुधारणं शक्य नाहीं. जेव्हां प्रचंड असा एखादा भूकंपाचा धक्का बसून चोहोंकडे उलथापालथ होते न् ती उलथापालथ झाल्यानंतर पुनः घडी बसविण्याचे प्रयत्न होतात, तसं कांहीं तरी या बाबत झालं तरच सुधारणा होईल. हा भूकंपाचा धक्का श्रीमंतांपासून गरीबापर्यंत नि शहरांपासून खेड्यांपर्यंत सगळीकडे सारखा बसला पाहिजे. मग नवी घडी बसविण्यासाठीं जो तो धडपड करूं लागेल. जगांत अशी कांहीं तरी प्रचंड प्रमाणांत उलाढाल होईल—न जाणों कदाचित् गेल्या महायुद्धासारखं महायुद्ध पुनः जगभर पसरलं तर हें शक्य आहे. तुमचीं खेडयापाडयांतलीं पोटासाठीं सतत धडपडत राहाणारीं

माणसं काय करणार ? उद्यांची काळजी ज्यांना कधीं सुटत नाहीं तीं कसली मर्दुमकी दाखवणार ! फार तर जुल्म जबरदस्ती करणाऱ्या एखाद्या दाजिबा सारख्या जमीनदाराचा खून करतील." जगन्नाथ आवेशानें बोलत होता.

क्षणभर तो थांबला. आणि पुनः महादेवांना म्हणाला, "बाबा, तुमचा उत्साहभंग करण्याची माझी इच्छा नाहीं—किंवा विलायतेहून कांहीं तरी खूळ मीं आणलं आहे असंही तुम्हाला वाटायला नको. पण मला प्रामाणिकपणं असं वाटतं कीं—खेड्यापाड्यांची सुधारणा आजच्या आमच्या पारतंत्र्याच्या काळांत होणं शक्य नाहीं. खेड्यांत एवढं दारिद्र्य अन् अज्ञान पसरलं आहे, कीं त्यांचं निर्मूलन आमच्या प्रयत्नांनीं होणं शक्य नाहीं. आमचीं खेडीं आज अक्षरशः भुकेनं मरत आहेत. त्यांना आधीं पोटभर अन्न मिळालं पाहिजे. पोटभर अन्न मिळत नाहीं म्हणून त्यांना दुसरा कसलाही विचार करायला वेळ नसतो. पोटासाठीं वाटेल तें करायला त्यांची तयारी असते. त्यांत आणखी परंपरागत अज्ञानाची भर पडलेली. धार्मिक रूढींचं जाळं इतकं दाट त्यांच्याभोंवतीं पसरलेलं असतं, कीं त्यांतून त्यांना कसलाच मार्ग दिसत नाहीं. त्यांत सर्वदा ते गुरफटलेले असतात. यांतून त्यांची मुक्तता करण्यास आज आपण असमर्थ आहोंत. परकीय सत्तेच्या हातांत साऱ्या नाड्या आहेत. त्या अगोदर काढून घेतल्या पाहिजेत."

"याचा अर्थ पुनः शहरांत गेलं पाहिजे मला —" महादेव उद्वेगानें म्हणाले.

"खरंच तें. तुमच्यासारख्या बुद्धिमान् माणसानं पुनः शहरांतच गेलं पाहिजे. तेथेंच राहून चळवळींत पडलं पाहिजे — राजकीय चळवळींत पडलं पाहिजे. हिंदुस्थानचे पुढारी जो राजकीय झगडा करीत आहेत त्यांत तुमच्यासारख्या बुद्धिमान लोकांनीं हातभार लावला पाहिजे —"

"त्या धकाधकी मला जुळण्यासारख्या नाहींत जगू. म्हणून तर मी इथं आलों —"

"पण इथं जें कार्य तुम्ही चालविलं आहे तें निरपेक्ष बुद्धीनेंच चालविलं पाहिजे. मिशनरी, धर्मप्रसाराच्या बुद्धीनं खेड्यापाड्यांत कार्य करीत

होते, पण त्यांना यश किती अल्प आलं ? गांधींचे खेडीं सुधारण्याचे मार्गही मला असेच वाटतात. त्यांतही अल्प यशाचाच संभव दिसतो."

"राजकीय सत्ता हातीं मिळविण्याच्या प्रयत्नाबद्दल तरी कुठं एवढी खात्री आहे ?" महादेवांनीं प्रश्न केला. "एका वर्षात स्वराज्य मिळवून देण्याचं मागं नाहीं का गांधींनीं जाहीर केलं होतं ? तेव्हां, कशाबद्दलच कांहीं खात्री देतां येत नाहीं. प्रत्येकानं आपलं कार्य उद्यां यशस्वी होणार अशा अपेक्षेनं करीत रहाणं हाच सर्वांत चांगला मार्ग. मला स्वतःला राजकारणाची धकाधकी जमेलसं वाटत नाहीं. मी हेंच कार्य करीत राहाणार, मग यश थोडं का येईना !"

बाहेर पाऊस सारखा पडत होता. महादेवांना गतवर्षीची आठवण झाली. तो सबंध दिवस पाऊस मुळींच थांबला नाहीं. रात्रींही पाऊस सारखा पडत होता. रात्रभर आकाशांत सारखा गडगडाट होत होता आणि पाऊस त्याला सांथ देत होता.

सकाळीं उठून महादेव आणि जगन्नाथ बाहेर पाहूं लागले—चोंहीकडे कसें पाणीच पाणी होऊन गेलें होते. नदीचें पाणी वाढलें होतें आणि खालाटींत पाणी शिरत होतें. महादेवांच्या दारांत एक मोठें फणसाचें झाड होतें. त्यावरील पक्षांचें घरटें खालीं पडून छिन्नविछिन्न झालेलें त्यांना दिसलें. घरट्यांतील अंडीं फुटून गेलीं होतीं. कावळी फांदीवर थंडींत–पावसांत भिजून कुडकुडत आक्रोश करीत होती.

महादेवांचें हृदय कळवळून आलें. या घरट्यासारखीच लोकांच्या घरांची स्थिति तर होणार नाहींना, अशी त्यांच्या मनांत कल्पना आली. गतवर्षीची हकीकत जगन्नाथाला सांगून ते म्हणाले, "आजचा पाऊस कांहीं निराळाच दिसतो आहे. गेल्या वर्षी दोन दिवस पाऊस लागूनही एवढं पाणी आलं नव्हतं. आणखी जर असाच एकदोन दिवस पाऊस पडत राहिला तर हां हां म्हणतां पूर येऊन घरांत पाणी शिरेल—"

"बाबा, बाहेर येतां का ? आपण पहायला तर जाऊं !" जगन्नाथ उत्सुकतेनें म्हणाला. त्यानें सृष्टीचें हें रौद्र स्वरूप आजच प्रथम पाहिलें होतें. त्यांतील नाविन्यच त्याच्या दृष्टीला सुखावह वाटलें आणि त्यानें तो दिपून गेला.

महादेव आणि जगन्नाथ दोघे घराबाहेर पडले.

बाहेर चौहोकडे पाणीच पाणी झालें होतें आणि नदीचें पाणी गांवांत सारखें पुढें पुढें येत होतें. कांहींच्या अंगणाशेजारीं पाणी येऊन ठेपलें होतें. तरीही जणुं कांहींच घडलें नाहीं अशा बेफिकीरींत सारा गांव होता. नाहीं म्हणायला मधून मधून एखादा शेतकरी कांबळें डोकीवर घेऊन इकडून तिकडे जात असलेला दिसे.

महादेव म्हणाले, " जगू, पाहिलंस. सृष्टीनं एवढं भयंकर स्वरूप धारण केलं आहे तरी त्याचं लोकांना कांहीं नाहीं. त्यांचं संरक्षण करायला देवळांत देव बसला आहे ना? आकाश जरी कोसळून पडलं तरी ते घाबरायचे नाहींत—हं थांब—"

त्यांनीं जगूचा हात धरून त्याला मागें ओढलें. त्यासरशीं एक मोठा काळा-कभिन्न सर्प उडी मारून बाजूला पळाला. महादेव म्हणाले, " जपून पाऊल टाक! आधींच कोंकण म्हणजे किरडुवांचं गांव. तशांत पुरापावसाचे दिवस! पहा कशीं किड्यांसारखीं विवळत आहेत जिवाणूं!"

जगन्नाथाला आतां सृष्टीच्या रौद्र स्वरूपाची जाणीव होऊं लागली होती. तो काळसर्प पाहून त्याच्या अंगावर भीतीचे शहारे आले होते. आणि पुराची परिस्थिति पाहून त्याला वाटूं लागलें—पाणी असेंच वाढूं लागलें तर? तर हा गांव बुडून नाहीं जायचा?

त्या कल्पनेनें त्याला भीति वाटली.

सारा दिवस दोघेही गांवांत फिरत होते. आपल्या घरीं येऊन राहाण्याबद्दल त्यांनीं लोकांच्या खूप विनवण्या केल्या, पण कांहीं उपयोग झाला नाहीं. महादेवांना गत वर्षीचाच अनुभव आला.

दाजिबाच्या मृत्यूनें गांवांत आधींच भीतीचें वातावरण पसरलें होतें. केव्हां काय प्रसंग ओढवेल हें कुणालाच सांगतां येत नव्हतें. सारेजण मनांतल्या मनांत चूपचाप होऊन राहिले होते. घरांतून बाहेर पडण्याची कल्पनासुद्धां त्यांना सहन होत नव्हती. महादेवांनीं त्यांना परोपरीनें विनविलें, पण त्यांचें कुणीच ऐकिलें नाहीं.

त्या रात्रीं पावसाच्या मदतीला वादळ धांवून आलें. वादळानें रात्रीं असा कांहीं धुमाकूळ घातला, कीं ती रात्र महादेवांनीं जागून काढली.

मोठ्या पहांटेला उठून ते जाग घेऊं लागले. गांवांत कांहीं तरी गडबड चाललेली त्यांना ऐकूं आली. कांहीं तरी आवाज—गडबड आरडाओरडा होत आहे असें त्यांना वाटूं लागलें.

हातांत भला मोठा दांडा घेऊन ते बाहेर पडले. ते खालाटींत उतरूं लागले, तेव्हां वादळानें झाडांचा उडविलेला धुव्वा त्यांच्या दृष्टीला पडला. मोठमोठीं झाडें उन्मळून पडलीं होतीं.

आणि आणखी थोडेसे ते चालून जातात तों त्यांना दिसलें—खालाटी सारी पाण्यानें तुडुंब भरली आहे. त्यांच्या छातींत चर्रे झालें. ते उभे राहिले आणि पाहूं लागले: समोरच्या घरांत पाणी शिरलें होतें आणि लोकांची आरडाओरड स्पष्ट ऐकूं येत होती. अनेक लोकांच्या बोलण्याचा, ओरडण्याचा गजबजाट होत होता. मधूनच एखादें मूल रडत आहे कीं काय असा भास होत होता.

पाणी चांगलेंच वाढलें होतें. पुरुष दीड पुरुष उंचीचीं झाडें साफ बुडून गेलीं होतीं. पाण्यांतून कांहीं म्हैशी, बैल पोहत उंचवट्याकडे येत होते. कांहीं माणसेंही पोहत असलेलीं दिसत होतीं.

या वेळीं पाऊस नुकताच थांबत होता आणि चांगलें उजाडत होतें.

इतक्यांत पोहत पोहत भगवान तेथें येऊन पोंचला. त्याला महादेव म्हणाले, " भगवान, काय बातमी आहे रे ? घरांत पाणी कुठवर शिरलं आहे ? "

भगवान महादेवांना पाहून शरमला होता. चिंचेच्या झाडाला महादेवांना आपण बांधून ठेवल्याची आठवण त्याला ताजी होती. खालीं मान घालून त्यानें उत्तर दिलें:

" पाणी ? पाणी घरांत चांगलंच शिरलें आहे. ज्यांच्या घरांत माळा आहे त्यांनीं माळ्यावर ठाण मांडलं आहे. कुणी शेजारच्या घरीं गेले आहेत ! "

" कुणी बुडालं बिडालं नाहीं ना ? "

" हो. सदाशिवची आई बुडून मेली. अन्—"

" अन् काय ? "

" पडवींत त्याचीं गुरं होतीं. दोन बैल नी एक म्हैस, तींही तिथंच मेलीं. त्यांचं दावं सोडण्याचं म्हातारीच्या मरणामुळं कुणाला भान राहिलं नाहीं."

" अरेरे ! मुकीं बिचारीं जनावरं, तुमच्या निष्काळजीपणानं नाहक मरून गेलीं ! " महादेव कळवळून म्हणाले.

" आतां तूं निघालास कुठं, भगवान ? "

" तुमच्याकडेच येत होतों. रात्रींच येणार होतों, पण धीर निघत नव्हता. तुमचा मीं गुन्हा केला आहे बाबा ! माझ्या वडिलांसारखे तुम्ही. वेळोवेळीं आमच्यासाठीं धांवून आलां न् मींच तुम्हाला बांधून ठेवलं—" भगवानानें त्यांचे पाय धरले.

" वेड्या, त्याचं काय घेऊन बसलास. ऊठ. आधीं त्या लोकांचे जीव वाचवूं या. मग पाहूं काय तें."

भगवान उठून उभा राहिला.

" भगवान, होड्या किती मिळतील रे ? "

" मिळतील चारपांच. माझी एक होडी आहे, ती शोधून काढली पाहिजे. चाकरमान्यांची एक आहे — "

" मग तर आधीं निघ न् शोधून काढ तुझी होडी कुठं आहे ती. नि जेवढ्यांना इकडे आणतां येईल, त्यांना घेऊन ये. मी माणसं आणतों मदतीला. नीघ ! "

भगवानानें पाण्यांत पुनः उडी टाकली आणि तो जलद जलद पोहत जाऊं लागला.

महादेवांनीं लगेच अर्जुन, चाकरमानी आणि इतर कांहीं लोकांना बोलावून घेतलें.

चारसहा होड्या मिळाल्या आणि त्या माणसें आणायला बाहेर पडल्या.

पूर मात्र वाढत होता. नदीनें आपलें स्वरूप पार बदलून टाकलें होतें. ती महासागरासारखी दिसत होती.

चाकरमानी होडी माणसांनीं भरून घेऊन आले. ते सांगूं लागले, " असा पूर कधींच आला नव्हता. पुरानं सत्यनाश करून टाकला आहे. उद्यां उभं रहायला घर नाहीं राहिलं कुणाला ! "

" घरं कोसळलीं वाटतं ? "

" वाटायचं काय राह्यलंय् आतां ? धडाधड भिंती पडताहेत, माणसं मरताहेत. तुझं सांगणं ऐकते तर ? "

" काय माणसं मरताहेत ! मग त्यांना नाहीं का रे वांचवतां यायचं, सुरबा ?"

" आपल्यानं होईल तेवढं करायचं ! चला पुनः जाऊन येऊं ! "

चाकरमानी, अर्जुन आणि इतर कांहीं मंडळी होड्या वल्हवीत गांवांत जाऊन लोकांना आणीत होती. माणसें बरींच मेलीं होतीं. सुतारवाड्यांत आणि गांवकरवाड्यांत सारखे आर्तस्वर ऐकूं येत होते. एवढा पूर येईल याची कुणालाच फारशी कल्पना नसल्यामुळें बेसावधपणानेंच लोक मेले. आतां त्यांना हळहळ वाटत होती. महादेवांच्या सांगण्याप्रमाणें ऐकलें असतें, तर हा प्रसंग आला नसता असें त्यांना वाटूं लागलें. सारी चिजवस्त आणि मालमत्ता पाण्यांत बुडून गेली होती. फक्त आतां प्राण कसे वांचवायचे एवढाच त्यांचेपुढें प्रश्न होता.

सोमा फौजदार एका मोठ्या झाडावर जाऊन बसला होता.

तो सबंध दिवस महादेवांना मोठा गडबडीचा गेला. आलेल्या माणसांना कपडा आणि अन्न देण्याची व्यवस्था त्यांना करावी लागत होती. त्यांच्या घरांत राहायला खूप जागा होती, अन्नही होतें, पण कपडा कांहीं पुरेसा नव्हता. त्यामुळें लोकांना कसेंबसें अब्रूनें राहावें लागत होतें. लगेच त्यांनीं शहरांत माणसें पाठवून कपडे आणण्याची व्यवस्था केली.

पाऊस दोन दिवस पडत राहिला होता. आणि पूर कांहीं ओसरला

नव्हता. सोमा फौजदार दीड दिवस झाडावर बसून होता. त्याला काळूनें सहज कुठें पाहिला, तेव्हां त्याची झाडावरून सुटका झाली. भूक, अन्न, पाणी आणि झोंप यांच्या अभावीं त्याची दैना होऊन गेली होती. काळूनें त्याला आपल्या होडींत घेतला तेव्हां विचारलें,

" फौजदारा, माझी शिवाशिव नाहीं ना तुला व्हायची ? "

" नाहीं रे ! "

" बरं, भूक लागली असेल नाहीं तुला ? "

" होय तर, कांहीं असेल तर दे पाहूं ! "

" महाराच्या हातचं चालेल का ? "

" या वेळीं तूं महार नाहींस, मी महार आहें, झालं ? "

" चल तर ! आपण होडी अशी वळणानं घेऊं. तिथं होडी मी लावतों न् पळत घरीं जाऊन भाकरी आणतों ! "

" आण आण ! कांहीं वाटेल तें आण ! "

काळूनें होडी बाजूला घेतली आणि तो थोड्या वेळानें भाकरी घेऊन आला. फौजदारानें भाकरीचा क्षणांत फन्ना उडविला आणि ओंजळीनें पुराचें पाणी तोंडाला लावलें.

काळू हंसला.

" कां रे, हंसलास ? "

" नाहीं ! "

" तरी ? सांग ना ? "

" घाणेरडं पाणी घशाखालीं गेलं कसं, याचं हंसू आलं मला. वाटत होतं महारच असं पाणी पिऊं शकतात."

" तुला सांगितलं ना, कीं मी आजपासून महार झालों म्हणून. मग ? "

काळूनें त्याला महादेवांच्या घरीं आणून सोडलें.

* * * *

तिसऱ्या दिवशीं पुराची शोभा पहात जगन्नाथ, महादेव आणि अर्जुन उभे राहिले होते. जगन्नाथाला ही परिस्थिती अगदींच नवीन होती. तो आरंभाला बराचसा भांबावून गेला होता. तरीही या प्रसंगानें त्याची चित्तवृत्ति जागृत झाल्यासारखी त्याला वाटत होतें. जगन्नाथ तन्मय होऊन समोर पाहात होता.

त्याच्याकडे पाहून महादेव म्हणाले, " अज्ञान हें केवढं घातुक असतं ! आज ही स्थिति येईल असं गांवच्या कुणा एकातरी माणसाला वाटलं होतं ? त्याची जाणीव करून द्यायचा मीं प्रयत्न केला तरी त्यांचा विश्वास बसला नाहीं. अज्ञानाशीं झगडणं फार कठीण असतं ! "

" या अनुभवानं तरी ते आतां शहाणे होवोत ! " अर्जुन म्हणाला.

" सारा गांव धुऊन निघाला. आतां या लोकांचं कसं होणार हें मला कळत नाहीं. खायला अन्न नाहीं, पेहरायला वस्त्र नाहीं नि राहायला घर नाहीं. कसं जीवन कंठणार हे लोक ? मला तर एव्हांपासून यांची काळजी लागली आहे. निदान माझ्या सांगण्याप्रमाणं वागले तरी मी त्यांना सांवरून धरीन. पण कुणी सांगावं ? माझं ते ऐकतीलच असं कशावरून ? " महादेव म्हणाले.

" आतां तुमचं ऐकल्याखेरीज गत्यंतर नाहीं त्यांना. कुणाचा तरी आधार त्यांना आज हवा आहे. तो आधार जर तुम्हीं त्यांना दिला तर ते तो अवश्य घेतील. पण एकदां ते पूर्व स्थितीला आल्यावर तुमचं ऐकतीलच असं मला तरी वाटत नाहीं. हा मनुष्य स्वभाव आहे. " जगन्नाथ म्हणाला.

" असं कां म्हणतोस ? आतां गांवांत मला फारसा विरोध राहाणार नाहीं. लोक माझ्याशीं स्नेहानं वागतील असं नाहीं का तुला वाटत ? मी मग पुनः माझे प्रयत्न सुरू करीन. शाळा काढीन, सूत काढायला शिकवीन, त्यांना लहान लहान उद्योगधंदे करायला लावीन — "

" खेडेगांवचा शेतकरी हा अज्ञानानं इतका भारावलेला असतो, कीं या तुमच्या प्रयत्नांनीं त्याचं अज्ञान दूर व्हायचं नाहीं. एका पोटाखेरीज त्याला जगांतल्या कोणत्याही ज्ञानाचा आनंद लुटतां येत नाहीं. या पोटाच्या आड येणारावर मात्र तो तुटून पडेल. एरवीं तो कोंकराहूनही गरीब. त्याला तुम्ही सारा सूट द्या, तो तुम्हांला दुवा देईल. त्याला सुखांत रहातां येईल असं करा, तो आपला दर्जा वाढविण्याचा प्रयत्न स्वतांहून करील — त्याला शिकवून शहाणं करायचं असलं तर तशी त्याच्यावर सक्ती झाली पाहिजे. सरकार सारा द्यायचा हें जसं आज ठरून गेलं आहे, तसं प्रत्येक शेतकरी शिकला सवरलेला असला पाहिजे अशी जर सक्ती झाली तरच तो शिकेल. हें आज आपणाला करणं शक्य नाहीं. आपल्या हातीं तेवढा अधिकार नाहीं. अशी सक्ती झाली तर त्याचं अज्ञान आपोआप दूर होईल, तो स्वतःचं डोकं चालवूं लागेल. न जाणों कदाचित् असंही होईल, त्यांच्यांतलीं बुद्धिवान् माणसं शहरांत जातील न् निराळ्याच उद्योगधंद्यांत पडतील, नि शहरांतल्या उगाच भरताड झालेल्या माणसांना शेतांत येऊन नांगर धरावा लागेल. कदाचित् मग असंही होईल — शेतीभाती नि इतर काबाडकष्टाचीं कामं प्रतिष्ठितपणा पावतील. पण हें केव्हां घडून येईल ! सत्ता असेल तेव्हां. सत्तेवांचून कांहीं होणार नाहीं. न् तुमच्या खादीच्या मार्गानं नि इतर हस्तव्यवसायाच्या शिक्षणानं कांहींच होणार नाहीं. जिथें माणसांची प्रवृत्तीच जागृत झाली नाहीं तिथें बाह्य प्रयत्नांनीं काय होणार ? प्रवृत्ति स्फूर्तीनें तरी जागृत व्हावी लागते, किंवा सक्तीनें तिला कार्यप्रवृत्त करावं लागतं. उद्यां हिंदुस्थानच्या हातीं सत्ता आली कीं या खेड्यांचं आपण नंदनवन करूं शकूं. माणसाला खायला प्यायला भरपूर मिळायला लागलं, कीं ते सक्तीलाही राजी होतात —"

" मलाही असंच वाटतं, बाबा." अर्जुन मध्येंच म्हणाला. " अस्पृश्यता निवारण होण्याबद्दल थोडी का चळवळ आज कित्येक वर्षें चालू आहे ? पण तिला काय यश मिळालं ? शिवाशिवीचं प्रस्थ शहरातून मोडलेलं असलं तरी अस्पृश्यांना सामाजिक दर्जा अजून मिळालेला नाहीं. अजूनही महार चांभार आपल्या पूर्वीच्याच स्थानीं आहेत. इंग्रज सरकारनं जर आज कायदा केला — अस्पृश्यता निवारणेच्या विरोधकांना भयंकर शिक्षा ठोठावल्या, आम्हांला प्रत्येक

ठिकाणीं सन्मानानं वागतां येईल असं केलं, तर खात्रीनें आज आहे याहून ही अस्पृश्यता किती तरी कमी होईल—"

" हृदयपालटापेक्षां कायदा प्रभावी ठरत नाहीं—"

" सतीची चाल कायद्याच्या एका फटकाऱ्यासरशी नाहींशी झालीच ना ? "

" तुमचं म्हणणं मला खोडून काढतां येत नाहीं—थोडंसं बुद्धीला पटतं, पण भावनेला पटत नाहीं ! " महादेव हंसून म्हणाले.

" कोणतंही कार्य भावनेपेक्षां बुद्धीनेंच करावं. भावनेवर भर दिला, कीं कुणाची कोणती भावना केव्हां जागृत होईल तें सांगतां येत नाहीं नि कार्याचा चुथडा होतो ! " जगन्नाथानें उत्तर दिलें.

" पण मला ही मोठी संधी मिळणार आहे आतां. त्या संधीचा उपयोग मला करून घेतलाच पाहिजे. पुनः प्रयोग करून पाहायचं ठरवलं आहे मीं ! "

" ठीक आहे. तुमच्या मार्गांत आम्ही आड येत नाहीं. तुमचे प्रयोग तुम्ही खुशाल चालवा. प्रयोग करणारींही माणसं आपल्या देशांत आज असलीं पाहिजेत. उद्यां देश स्वतंत्र झाला कीं त्यांचे प्रयोग मार्गदर्शक झाल्यावांचून राहाणार नाहींत—" जगन्नाथ म्हणाला.

इतक्यांत सर्वांची नजर पुरांतील एक दृश्याकडे गेली.

महापुरांत एक मोठा सर्प पाण्यावर डोकें काढून पोहत चालला होता आणि त्याच्या डोकीवर एक बेडूक बसला होता.

तें दृश्य जगन्नाथ सारखा पहात होता. बेडकाला नेहमीं गट्ट करणारा सर्प आज कोणतीही तक्रार न करतां त्याला आपल्या डोकीवर बसायला देऊन स्वतःसाठीं इकडे तिकडे फिरून सुरक्षित जागा पहात होता.

: लेखनकाल :
जानेवारी १९४१
ते
आक्टोबर १९४१

---

समाप्त

---